ISSN 2249-0817 WARUL

**वारूळ (त्रैमासिक)**

वर्ष १४ वे, अंक २ रा,
मार्च, एप्रिल, मे २०२२

**शरणकुमार लिंबाळे**
**साहित्य विशेषांक**

---

**ह्या अंकात,**



---



**वारूळ**
(नवनिर्मिती आणि समीक्षेच्या प्रवाहांना वाहिलेले वाङ्मयीन त्रैमासिक)
कार्यकारी संपादक : डॉ. सतेज दणाणे
संपादक : **डॉ. सौ. कमल दणाणे**
शोधनिबंध हा श्री लिपीमधील फाँट नं. ७१४ साईज मध्ये टाईप करून
satejdanane@gmail.com / warultriamasik@gmail.com ह्या ई–मेलवर पाठवावा.
(हे त्रैमासिक मालक / प्रकाशक / संपादक / कमल दणाणे यांनी पौर्णिमा प्रिंटिंग प्रेस, कोल्हापूर येथे छापून युनिट नं. १, प्लॉट नं. १, अंबाई डिफेन्स कॉलनी, कोल्हापूर येथे प्रसिद्ध केले.)

ISSN 2249-0817 WARUL

# शरणकुमार लिंबाळे

**– लक्ष्मण गायकवाड, मुंबई**

मित्र हो, माझे मित्र मराठीतले सुप्रसिद्ध लेखक शरणकुमार लिंबाळे यांना मानाचा भारतातील साहित्याचा सरस 'सरस्वती सन्मान' मिळाला आणि त्याचा माझ्यासारख्याला खूप आनंद झाला. खरेतर शरणकुमार लिंबाळे हे माझे मित्र लातूर पासून आहेत. त्यांचे पहिले कवितासंग्रह लातूर मधूनच आले. त्यांचा 'उत्पात' नावाचा कवितासंग्रह आज ही माझ्या डोक्यातून जाता जात नाही. उत्पात मधील कविता गावकुसाबाहेरच्या अस्पृश्य समाजांच्या हाल–अपेष्टा, बयान करतात. शरणकुमार लिंबाळे हे अत्यंत हलाखिच्या, गरिबीच्या परिस्थितीमधून उदयास आलेलं साहित्यातील एक कमळ आहे. शरणकुमार लिंबाळे यांचा आजही मी त्या काळातील दिवस आठवतो. त्यांना राहण्यासाठी अस्पृश्य समाजातील व्यक्ती म्हणून भाड्याने घर मिळत नव्हते. तेव्हा मी लातूरमधील वडार समाजाच्या वस्तीत त्यांना किरायाने घर मिळवून दिले होते. शरणकुमार लिंबाळे हे माझे अत्यंत जिवलग मित्र एवढ्यासाठी आहेत की, सामाजिक चळवळीमध्ये लातुरातील 'कथी हातोडा मोर्चा' काढला. तेव्हा मी भटक्या–विमुक्तांची खूप मोठी विमुक्त भटक्यांची संघटना चालवत होतो. त्याचे साक्षीदार शरणकुमार लिंबाळे आहेत. आम्ही आणिक रात्र–रात्र साहित्यावर 'कवितेवर गप्पा मारायचो' माझे चळवळीतील अनुभव आपण लिहून काढावे, अशी त्यांची कायमची पाठराखण माझ्याबरोबर होती म्हणूनच मी 'उचल्या' पुस्तक लिहिण्यास हाती घेतलो. तेव्हा ते माझे जवळचे मित्र होते. मी 'उचल्या' लिहिण्याच्या अगोदरच शरणकुमार लिंबाळे यांचे 'अक्करमाशी' पुस्तक माझ्या अगोदर आले, पण आमची मैत्री कायमची राहिली आणि त्यांच्या सहवासामुळे मीही साहित्यात नावारूपाला आलो. खरेतर शरणकुमार लिंबाळे हे मुळातच एक अत्यंत संवेदनशील साहित्यिक आहेत, पण त्याबरोबर सामाजिक विचारांचा पगडा त्यांच्यावर मोठ्या प्रमाणात आहे, खरेतर त्यांना अगोदरच कुठला मोठा सन्मान मिळायला हवा होता. ते दलित साहित्यातील महाराष्ट्रात एकमेव असे साहित्यिक आहेत की, ज्यांच्या अनेक विषयावरती पुस्तकांनी साहित्यात पदार्पण केलेले आहे. शरणकुमार लिंबाळे यांना 'सरस्वती सन्मान' मिळाल्यामुळे त्यांचे आज महाराष्ट्रच नव्हे, तर देशभर कौतुक होत आहे. शरणकुमार

लिंबाळे मराठीतील एकमेव साहित्यिक असे आहेत की, ज्यांची अनुवादित पुस्तके संपूर्ण भारतात वेगवेगळ्या भाषेमध्ये आली आहेत. अशा एका माझ्या मित्राला साहित्यामध्ये 'सरस्वती सन्मान' मिळतो हे मला आनंदाचा दिवस वाटतो. डॉ. शरणकुमार लिंबाळे हे सोलापूर मध्ये कामाला लागले आणि ते सोलापूरमध्ये एक वर्ष कार्यरत राहिले. तिथे पण लातूर ते सोलापूर अशा चक्रा व्हायच्या आणि त्यांच्याशी साहित्यावर चर्चा होत असे.

शरणकुमार लिंबाळे हे सोलापूर वरून नाशिकच्या 'यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ येथे गेले; आणि ते पुण्यामध्ये स्थायिक झाले; खरेतर शरणकुमार लिंबाळे यांचे पन्नासावर अधिक पुस्तके दिलीपराज प्रकाशनने छापलेली आहेत. त्यांनी दलित साहित्यातील अनेक विषय हाताळले आहेत. त्यांची हिंदीमध्ये अनेक पुस्तके आली आहेत. त्याची चर्चा दिल्लीच्या हिन्दी साहित्यामध्ये सातत्याने होते. शरणकुमार लिंबाळे यांच्या पुस्तकाचे अनेक अनुवाद झाले आहेत. ते काही काळ माझ्याबरोबर साहित्य अकादमी भारत सरकार यांच्या कमिटीवर पण होते. तसे त्यांना अनेक मान-सन्मान मिळालेले आहेत. भारत सरकारची साहित्य अकादमी फेलोशिप मिळाली आहे. त्यांचे माझे घरेलू संबंध अनेक वर्षापासून चालू आहेत. शरणकुमार लिंबाळे यांच्याविषयी मी फार काही बोलावे असे नाही. शरणकुमार लिंबाळे हे चालते-बोलते विद्यापीठच आहेत. खरेतर शरणकुमार लिंबाळे यांना 'सरस्वती सन्मान' मिळाल्यानंतर त्यांच्यावरती टीकाटिप्पणी होत आहे, हे मला चुकीचे वाटते. साहित्यात शरणकुमार लिंबाळेंना अनेक मानसन्मान मिळाले. ते त्यांच्या कर्तृत्वावर, त्यांच्या साहित्यावर हे लक्षात घ्यावे. दलित लेखकांना तिला संशयाची लेबले लावणे हे योग्य नव्हे, असे मला वाटते. कुठलाही पुरस्कार सन्मान हा साहित्याचा असतो. ते सहजपणे घेतले पाहिजे त्याचा मान सन्मान झाला पाहिजे असेही मला यानिमित्ताने वाटते.

डॉ. शरणकुमार लिंबाळे यांनी मराठी साहित्यातच नव्हे, तर भारतामधल्या अनेक भाषेमध्ये दलित साहित्याचा चेहरामोहरा बदलून एक नवं पर्व जे फुले-आंबेडकरी विचाराला साजेशे आहे. अशी साहित्य निर्माण करण्याचे मोठे काम शरणकुमार लिंबाळे यांनी केले आहे. याचा मला अभिमान वाटतो. डॉ. शरणकुमार लिंबाळे वरती माझे मित्र डॉ. प्रा.सतेज दणाणे वारूळ त्रैमासिकाचा विशेषांक काढत आहेत. याचा मला आनंद वाटतो. म्हणून ही छोटेखानी लेख लिहीत आहे. येणाऱ्या काळात शरणकुमार लिंबाळे हे अधिकाधिक साहित्य क्षेत्रात त्यांची भरीव वाटचाल व्हावी अशी शुभकामना देतो आणि थांबतो.

ISSN 2249-0817 WARUL

# जळजळीत लेखन करणारा ध्येयवेडा लेखक

**– के.व्ही. सरवदे**

दिनांक ३० मार्च २०२१ वार्ता झळकली, या वार्तेत ज्येष्ठ लेखक डॉ. शरणकुमार लिंबाळे यांना के. के. बिर्ला फौंडेशन या संस्थेचा सन्मानाचा सरस्वती पुरस्कार जाहीर झाला. हा पुरस्कार सनातन या कादंबरीला देऊन त्यांना नावाजले गेले. एकूण पंधरा लाखाचा घवघवीत पुरस्कार दिल्यामुळे डॉ.शरणकुमार लिंबाळेसह दलित साहित्य चळवळीच्या शिरपेचात सन्मानाचा तुरा रोवला गेला, हे ऐकून माझ्या सारख्या त्यांच्या चहात्याला हर्षोल्हासाने गगन ठेंगणे झाले. मी ही या साहित्य चळवळीचा घटक असल्यामुळे अद्वितीय असा आनंद होणे स्वाभाविकच आहे, तसे त्यांना राज्यातून आणि देशाच्या विविध भागातून अभिनंदनाचा अक्षरशः वर्षाव करण्यात आला.

त्यांचा आणि माझा घनिष्ठ संबंध गेल्या तीन–चार दशकापासूनचा आहे. त्यात त्यांचा पहिला संग्रह ते अहमदपूरला असताना निघाला. मी या संग्रहावर समीक्षण लिहिले. ते दैनिक लोकमतच्या 'साहित्य जत्रा' रविवार पुरवणीने प्रकाशित केले. या संग्रहाची गुणग्राहकता आणि वेगळेपणा मी त्यातून विशद केली होती. त्यामुळे जवळीकता प्रेम आणि अत्यंतिक जिव्हाळा निर्माण झाला. उत्पातच्या प्रसिद्धीकरणामुळे ते प्रकाशाच्या झोतात आले. ते झपाटलेल्या वादळागत लिहू लागले.

मी पहिल्यांदा त्यांना भेटायला गेलो. किडमिडीत बांध्याचा पाच फूट उंचीचा, डोक्यावर केस राखलेला दलित पँथरचेच मला सकृतदर्शिनी दिसून आले. ते टेलिफोन खात्यात टेलिफोन ऑप्रेटर म्हणून काम करीत होते. मी त्यांना माझा परिचय दिल्यानंतर ते जागेवरुन उठले हातात हात घेऊन शेकहँड केला आणि मला जवळच्या खुर्चीत बसवून घेतले. मी त्यांचे कार्य पाहून स्तंभितच झालो. एकीकडे कानाला रिसिव्हर लावून कॉल स्वीकारत होते आणि त्यांना देत होते. हे करता करता त्यांचं लेखन चालूच होते. आता मला सांगा ब्रश करता करताही त्यांचे लेखन चालूच असावे काय? जगावेगळा हा लेखक स्वप्न पाहत होता. लेखन उर्मी उरात

एवढी दाटून येत होती की, ती लिहून काढल्याशिवाय स्वस्थ बसत नव्हते.

हा वादळ झपाटा अहोरात्र चालूच होता. अनुभवाला जो कडवटपणा आला, तो भोगवटा भोगला तो उरात खदखदत होता. त्यातून अक्करमाशीचे वेगळ्या अनुभूतीचे तीव्र दुःख प्रगटन झालं. यशवंता पाटलानं त्यांच्या आईला रखेल म्हणून ठेवले होते. त्यातूनच जन्म झाल्याचे लक्षात येताच, तो आतल्या आत इतका दुमसत होता. विद्रोहाने इतका पेटला होता की, पाटलाच्या म्हाताऱ्या गायीवर चढून पाटलाचा बदला घ्यावा असे त्याला वाटते. इतका तो पेटून उठतो. ही दुनिया वेगळा अनुभव, त्याची तडफड त्यातून झालेली अवहेलना विराट दुःखाशिवाय असू शकते? हे अक्करमाशीतून निर्भीडपणे व्यक्त झाले आहे.

अक्करमाशीवरही मी समीक्षात्मक लिहिले. ते दै. विश्वसमाचार आणि पुढे वाईवरून विश्वकोशाद्वारे प्रकाशित होणाऱ्या नवभारत या मासिकातूनही प्रसिद्धीकरण झाले. इथूनच पत्रव्यवहार सुरू झाला. तो अखंडीत चालूच राहिला. अहमदपूरहून ते सोलापूर येथे बदलून आले. महीगल्ली सारख्या बकाल वस्तीत चार पत्र्यांच्या खोलीत किरायाने राहू लागले. तिथे कसल्याही स्वरुपाची भौवतिक सुविधा नव्हती. चार पत्र्यांच्या खोलीत पलंग तेवढा टाकता येऊ शकत होता. तिथंच चुलीवर स्वयंपाक, तिथंच जेवण आणि तिथचं झोपण असे खडतर जीवन चालू होते. अशा प्रतिकूल परिस्थितीतून लेखनाचा हव्यास आणि व्यासंग बलदंड होत गेला. परिस्थितीची भीती बाळगली नाही, पण आपला निजी ध्यास, ध्येयाची ते कधीही प्रतारणा करू शकले नाही. तोफेतून जशी धडाधड बारूदीचे प्रस्फोटीत गोळे बाहेर पडावे, तसे शब्दगारांचा मारा प्रस्थापित व्यवस्थेवर केला जात होता. अन्यायाचा वचपा लेखनीच्या टोकातून ज्वालामुखातून जसा स्तरावा तसा स्त्रवत होता.

अस्मितादर्श दलित साहित्याचा पॉवर हाऊसने त्यांच्या रससरणाऱ्या कलाकृतीची दखल घेतली. त्यांचे दुःख चव्हाट्यावर मांडले गेले. विविध प्रागतिक साहित्य पत्रिकेनी. ही त्यांचे साहित्य उचलून धरले. हळूहळू हा वयानं कमी उमदा व्यक्ती बड्याबड्या मातब्बर साहित्यिकांच्या मांदियाळीत जाऊन बसला. अखंड साधना, अखंड लेखन ध्यास, वाचन, लेखन, मनन, चिंतन या प्रक्रियेतून प्रतिभेला घुमारे फुटत गेले. अखंड मनन चालू असताना हा लेखक अल्पसंतुष्ट राहिला नाही. एकीकडे लेखनाची उर्मी वाढत असताना दुसरीकडे शैक्षणिक क्षमताही हाशील

करीत होता. मॅट्रीक नंतर बहिस्थ विद्यार्थी म्हणून परीक्षा देऊन वरचेवर पदव्या प्राप्त करीत होते. बी. ए. नंतर एम. ए. आणि एम. ए. नंतर पी.एच. डी. पर्यंत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा आदर्श डोळ्यापुढे ठेवून ज्ञानपिपासू होत होता. ज्ञानाची तहानभूक भागवित होता. असा दुहेरी तिहेरी संघर्ष चालू होता. दिवसाचा प्रत्येक क्षणनक्षण त्यांना महनीय वाटत होता. तो त्यांनी व्यर्थ दडवला नाही. अशी शैक्षणिक पात्रता मिळवल्यानंतर एका खात्यातून वेगवेगळ्या खात्यातील नोकऱ्या त्यांना बोलावित होत्या. टेलिफोन खाते पादाक्रांत करून ते आकाशवाणी सोलापूर केंद्रात निवेदक म्हणून नोकरीला लागले. तेथून जी मजल मारली, ती नासिकच्या यशवंतराव मुक्त विद्यापीठात संचालकपदी. इथंच ते डायरेक्टर स्थिरावले. इथूनच ते सेवानिवृत्त झाले.

ही त्यांची धडपड आणि खडतर परिश्रमाची फलश्रुती म्हणून ते चाळीस कलाकृतीचे आणि ग्रंथाचे सन्माननीय धनी झाले. अगदी तारुण्याच्या ऐन उमेदीच्या काळात प्रचंड संख्येनी लेखन करणारा हाच एकमेवद्वितीय दलित साहित्यिक म्हणावा लागेल. त्यांच्या विकल जीवनाकडून उच्च शिखरापर्यंत सिंहावलोकन करून पाहिले तर आश्चर्याने तोंडात बोट घालावयास भाग पडते. अर्थात सरस्वती पुरस्कारांनी नावलौकिकत्व प्राप्त व्हावे, म्हणून त्यांनी पुरस्कारासाठी लिहिले नाही. कुठलाही दलित साहित्यिक कसल्याही हव्यासासाठी खंत करत नाही. मानसन्मानासाठी हपापलेला नाही. दलितांचे विराट दु:ख, दलदलित पडलेले किटकाचं जीणे त्यांची अमानुषपणे केलेली अवहेलना, अन्याय अत्याचाराच्या चरक्यात पिळून, होरपळून काढणारे त्यांचे जीवन जगाच्या वेशीवर टांगण्यासाठी आणि त्यांना इतराप्रमाणेच मनुष्यत्वाचे जीवन प्रदान करावं म्हणून दलित लेखन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना, फुले शाहू बुद्धाला प्रेरणास्थानी ठेवून आपल्या लेखण्या झिजवीत आले आहेत. झिजवत आहेत.

पण काही मराठी साहित्यिकांनी आणि तथाकथित समीक्षकानी त्यांच्या लेखन कृतीतील मानव्य मानवतावादाकडे नाक डोळे मोडले. ते आपल्या पठडीतले नाही. आपल्या ग्रुपच्या साचात बसत नाही म्हणून पान्हा चोरण्याने पातक केले. कलावादाचा ढाच्या पुढे करून त्या कलाकृती अव्हेरल्या. पण दूरस्थ परभाषेतील 'सनातन' या कादंबरीचे निस्पृहपणे निसंकोचपणे मोल ओळखले आणि सर्वोच्च पदासाठीचे औदार्य

दाखवले. या तथाकथितांच्या आसूयेने भरलेल्या पोटात आता दुखत असले पाहिजे, पण कोणाच्या शिफारशीची आणि तोंड पुजल्या गौरवाची तमा न बाळगता दलित साहित्य कलाकृती भाषेच्या आणि देशाच्या सीमा पार करून देश विदेशात जाऊन धडकल्या. त्यांचे जगभरातील विविध भाषेत अनुवाद करून वाचल्या जाऊ लागल्या. विविध विद्यापीठांच्या अभ्यासक्रमात शिकवल्या जाऊ लागल्या. अभ्यासल्या जाऊ लागल्या.

डॉ. शरणकुमार लिंबाळे यांच्याही लेखन कलाकृती मराठी भाषिक सीमा ओलांडून तेलगू, कानडी, तमीळ, मल्याळी, बंगाली, उर्दू, उडिया, आसामी, गुजराती, सिंधी, इंग्रजी या अन्य भारतीय भाषिक प्रांतात त्या पोहोचलेल्या आहेत. त्यांच्या अक्करमाशी तर ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस सारख्या नामांकित प्रकाशन संस्थेने इंग्रजी भाषेत अनुवाद केला आहे. वाणी प्रकाशन सारखी मातब्बर संस्था हिंदी भाषांतर करत आहे. त्यांच्या कलाकृतींना साहित्य अकॅडमीतून अनेक पुरस्कार लाभले आहेत. त्यामुळे लिंबाळे आता मराठी भाषेपुरतीच लेखन उरले नाही, तर ते देशाच्या सीमा पार करून जागतिक स्तरावरील लेखकांच्या मालिकेत जाऊन पोहोचले आहेत. त्यांचा वाचकवर्ग वाढलेला आहे. तो यापुढे प्रचंड प्रमाणात वाढत जाणार आहे, असेहे दुर्मीळ मराठीतले लेखक म्हणून जागतिक क्षितिजावर चमकत राहणार आहेत.

त्यांचे लेखन हे एकाच पठडीतले नाही, कविता, स्वकथन, कथा, कादंबरी, समीक्षा, वैचारिक आणि साहित्यिक सिद्धांतावर आधारित असे चौफेर लेखन केले आहे. त्यातून आपल्या व्यक्तिमत्वाचा आणि व्यक्तितत्त्वाचा अनोखा असाम ठसा उमटविलेला आहे.

हा लेखक माझ्या अत्यंत जवळचा सखा सोबती झाला आहे. त्यांचे साहित्य वाचण्याचे आणि लिहिण्याचे भाग्य मला प्राप्त झाले. ते साहित्यिक मोठे आहेतच. त्यांना तसा नावलौकिक प्राप्त झाला आहेच. तसेच माणूस म्हणून ही ते श्रेष्ठ आहेत.

आम्हा उभयतांचा पत्रप्रपंच खूप मोठ्या प्रमाणात झालाच तसेच आम्ही परस्पराच्या घरी देखील येत जात राहिलो. ते त्यावेळी सोलापुरातील मड्डीगल्लीत राहत होते. मी तिथे एकदा भेटायला गेलो. चर्चा, गप्पा मारण्यात कसा वेळ गेला हे कळलेच नाही. वेळ झाल्यामुळे ते मला म्हणाले, वेळ खूप झाला. आता करा

मुक्काम इथेच.'

त्यांनी आग्रह करून मला मुक्काम करण्यास भाग पाडले. पाहुणचार केला मोठ्या आवडीने वहिनींनी स्वयंपाक करून खाऊ घातला. आता आराम करायचा कुठे माझ्यापुढे एक गहन प्रश्न उभा राहिला. कोण्य लॉज वर जावं तर माझी तेवढी 'त्यावेळी ऐपत नव्हती. त्यांची एकच खोली चार पत्र्यांची. तिथंच कॉट टाकलेला. याच खोलीत स्वयंपाक आणि याच खोलीत ते नवरा बायको कसे झोपत असतील. त्यांचे तेच जाणो. द्रविड त्यावेळी लहान पिणारं बाळ होता.

''शरण जेवण तर झाले आहे. आता झोपायचं कुठं.? तुमच्या ऑफिसात कुठे सोय होणार नाही का?''

''इथं काय झाले? इतरत्र कुठे जायचे नाही. इथचं झोपायचं. आम्ही दोघे नवरा-बायको कॉटखाली झोपू. तुम्ही निसंकोचपणे कॉटवर झोपायचे. अहो या चार पत्र्याच्या खोलीत बाबा आढाव सारखे कार्यकर्ते, नेते मुक्काम करून गेले आहेत तुम्हीही खुशाल झोपा.''

मी फार संकोचलो. त्यांचा आग्रह मला मोडता आला नाही. ती रात्र मी संकोचलेल्या अवस्थेत झोपून काढली. मड्डीवस्ती म्हणजे कामगाराची कष्टकऱ्यांची वस्ती होती. सकाळच्या प्रातर्विधीची सोय तिथे नव्हती. सकाळी उठल्याबरोबर मला त्यांनी सायकलवर डबलसीट बसवून सोय असणाऱ्या त्यांच्या ऑफिसात नेले.

शरणकुमारनं टेलिफोन ऑपरेटरची नोकरी सोडून दिली होती. ते सोलापूर आकाशवाणी केंद्रात निवेदक म्हणून रुजू झाले होते. त्यामुळे त्यांनी मड्डी वस्तीतील खोली सोडून दिली होती आणि आकाशवाणी केंद्रा नजीक कुमठा नाका विभागात स्वतंत्र दोन खोल्या, स्वयंपाक घर, वेगळी बैठक खोली, वेगळी संडास बाथरूमची सोय असणारी व्यवस्था तिथे होती, त्या प्रशस्त घरात ते राहत होते. शरणकुमार यांनी माझ्या 'काळोखगर्भ' हा पहिला कथासंग्रह काढण्यासाठी प्रियदर्शी प्रकाशन चे दिलीप गवळी यांच्याकडे प्रकाशनार्थ शिफारस केली होती. हा कथासंग्रह साहित्य संस्कृती मंडळाकडून न वाचताच तसाच धूळखात पडून ठेवला होता. त्यावेळी सुरेंद्र बारलिंगे हे त्या मंडळावर होते. त्यांना मी पत्र लिहून कळवले की खूप महिने झाले. माझ्या एका मित्राला आपण अनुदान दिले. दोघांनी आमचे हस्तलिखित

एकदाच पाठवले. मला 'होई–नाही' काहीतरी कळवले गेले की नाही. ते पत्र डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी वाचले असावे. माझे पत्र पाठवून चार–पाच दिवस झाले नाही माझ्या कथासंग्रहाचे बाड जशाच्या तसे माझ्या पत्त्यावर बाय रजिस्टर पोस्टाने पाठवण्यात आले. याचा अर्थ ते वाचले गेलेच नाही. हे शल्य जिव्हारी लागल्याने मी शरणकुमारला लिहिले. दिलीप गवळी यांनी हा कथासंग्रह स्वीकारला, प्रकाशित केला, पुढे 'तुंबलेले पाणी' हा दुसरा कथासंग्रह देखील त्यांच्या पसंतीस उतरला. तोही त्यांनी प्रकाशित केला. शरणकुमारच्या शिफारशीचा मला फायदा मिळाला. मला लाभ झाला. काळोखगर्भच्या मलपृष्ठावर त्यांनी माझ्या कथेची महती वर्णन करून माझा गौरव केला आणि माझी पाठराखण केली. त्याचा परिणाम माझा तिसरा कथासंग्रह 'उद्ध्वस्तलेली गढी' ही त्यांनी प्रकाशित केला. संग्रहारूपाने कथाकार म्हणून उभा करण्याचे श्रेय मी शरणकुमारला देईन.

पहिल्या कथासंग्रहाच्या काही प्रती हाती पडल्यानंतर शरणकुमार आणि योगीराज वाघमारे यांना आपरुगीनं ऋणनिर्देश म्हणून दाखवण्यासाठी दोन प्रती घेऊन स्वतः सोलापूरला गेलो. प्रथम योगीराजच्या घरी गेलो. त्यांनी शरणकुमारला घरी बोलावून घेतले. ते थोड्याच वेळात आले. मी योगीराजला एक आणि शरणकुमारला दुसरी प्रत भेट दिली. योगीराज त्यावेळी त्यांचा दत्तकपुत्र गौरव उर्फ सोन्याला खेळवत बसले होते. हल्ला चढवला. झडप घेऊन पुस्तक उलटपालट करू लागला. तो त्यावेळी पाच–सहा महिन्याचा असेल. 'अरे गप रे बापू सोन्या, पुस्तकाच्या बापासमोरच तू त्यांच्या बाळा बरोबर कुस्ती खेळतो आहेस. त्याला चारीमुंड्याचीत करून त्याचा गळा घोटत आहेस. तेव्हा त्याच्या बापाला काय यातना होत असतील, हे मी कसे तुला समजावून सांगू. योगीराज पुस्तकाची सोन्या आदळाआपट करताना म्हणाले 'या छोट्याशा बाळाला कोण पिता आणि कुणाचे बाळ हे कुठले कळणार होते तो आपल्याच नादात पुस्तकांचा चुरगळा करीत मस्त मजेत खेळत होता. हे कोरे करकरीत पुस्तकाचे पाने फाडीत म्हणून योगीराजने त्याच्या हातातले पुस्तक हिसकावून घेतले आणि बाजूला सुरक्षित ठिकाणी ठेवले. हे बघून सोन्या रडू लागला. ते न राहिल्याने शरणकुमार त्याला उद्देशून म्हणाले, 'गप्प गप्प रे ,माझ्या भावा. नको नको रडू. त्याच्या अपत्य बापाच्या समोर नको कुसकरू. मी तुला माझे पुस्तक आणून देतो. काय झटापटी करायचे ते त्याच्याबरोबर कर. अरे भाऊ मी

आणि तू एकाच पुस्तक एकाच कुळातील की रे. तुझ्या पपाचे नाव ऐकलास तरी हरकत नाही. तर निदान तुझ्या या थोरल्या भावाचे तरी ऐक. दे सोडून तुझा तो हट्ट. आणि माझ्याकडे बघून हस पाहू.' असं बोलून त्याने सोन्याला उचलून समजावित म्हणाले.

'दे, दे माझ्या हातात तुझा हात.' असं म्हणून त्याचा कोवळ्या हात हाती घेतला.

मग सोन्याला काय वाटले, कुणास ठाऊक शरणकुमारचं ऐकलं. तो रडणे थांबवून शांत झाला.

'वारे वा, माझ्या छोट्या भावा. माझे म्हणणे तू ऐकलं आणि समजून घेतलास मला किती आनंद झाला आहे कसं सांगू?'

शरणकुमाने अशा अर्थाची नाळ सोन्याबरोबर जोडली हे पाहून मी भावनावश झालो.

योगीराज/पाहुणचार होईपर्यंत आम्ही गप्पा मारत तिथेच थांबलो.

'आता चला आपण आपल्या घराकडे जाऊ. मस्तपैकी जेवण करू. आज येथेच मुक्काम करायचा आहे. बरं का सर, त्यांना मी आमच्या घरी नेतो. जेवण करतो. तिकडेच मुक्काम करतील आणि जातील उद्या निवांत त्यांच्या गावी.

योगीराजची परवानगी घेऊन आम्ही शरणकुमारच्या घरी आलो. 'आता तुम्ही फ्रेश व्हा. ही लुंगी लावा आणि करा कॉटवर आराम.'

त्यांनी मला 'दलित प्रेमकविता' या संपादित कविताची भेट दिली. जेवण झाल्यावर आम्ही वेगवेगळ्या विषयावर चर्चा करीत राहिलो. आमच्या गप्पा रंगत गेल्या. रात्रीचे दीड वाजले होते. 'आता झोपा' ते म्हणाले 'आपण खूप बोललो नाही. असा मुक्काम करून मी सकाळी उठून फ्रेश झालो. नाश्ता आटोपल्यावर योगीराज चा निरोप घेऊन कळंबकडे प्रस्थान केले. डॉ. शरणकुमार लिंबाळे याचा माझा संबंध अनेक कारणाने घनिष्ट होत गेला. सोलापूरच्या वास्तव्यात असताना मी त्यांच्याकडे वारंवार जात येत असे. त्यांच्याकडे गेलो म्हणजे ते राहण्याचा आपुलकीने आग्रह करायचे. राहण्याचा बेत ठरला की मला सोबत घेऊन फिरायला जायचे. घरी तर आम्ही बोलतच असो, रस्त्याने चालतानाही वाङ्मयीन चर्चा चालू असायची. आमच्या साहित्यिक गप्पा मधून ते आगामी लेखनाचे संकल्प मला

ऐकवायचे. 'घोडा लावा' या कादंबरीचा विषय आशय त्यांनी मला ऐकवला. तो ऐकून मी चाट पडलो. पुढे ही कादंबरी लिहिली की नाही, माझ्या वाचनात आली नाही. या कादंबरीची थिम मोठी, रोमांचक होती. 'घोडा लावा' म्हणजे प्रत्यक्ष घोडा लावण्याशी त्याचा संबंध नव्हता, तर पूर्वी शाळेत येण्यास कुचराई करणाऱ्या पोराला पकडून त्याला घोड्यावर बसवले जात होते आणि खालून छडीची जबर शिक्षा इतकी द्यायची की तो चड्डी ओली पिवळी करायचा. हा तो घोडा लावण्याचा प्रकार होता.

रस्त्याने चालता चालता ते थबकायचे आणि मला म्हणायचे ''के. व्ही. चला मी तुम्हाला माझ्या साहित्य वर्तुळातील साहित्यिक विचारवंताच्या ओळखी करून देतो.'' असे म्हणून त्यांच्या परिचित असणाऱ्या अंबादास शिंदे यांच्याशी प्रथम ओळख करून दिली. ते 'बंडखोर' नावाचे साप्ताहिक चालवत होते. या साप्ताहिक अंकाच्या जयंती विशेषांकात त्यांनी माझ्या कविता, कथा प्रकाशित केल्या होत्या. ते साप्ताहिकाच्या शीर्षकाप्रमाणे अत्यंत आक्रमक, बंडखोर दिसून आले.

अशीच एकदा प्रा. निशिकांत ठकार आणि प्रा. त्र्य.वि. सरदेशमुख यांच्या घरी भेट घडवून आणली. दोन्ही व्यक्ती अत्यंत गंभीर पण त्यांच्या विचारातून सखोलता दिसून आली. प्रा. फक्रुद्दीन बेनूर उभयंता सारखेच अभ्यासक आणि बोलके व्यक्तिमत्त्व दिसून आले. मुस्लिम समस्येवर त्यांची वैचारिक बैठक यातून सिद्ध होत होती. एका भेटीत त्यांनी मला आणि त्यांचे मेहुणे अरुण कांबळे यांना चित्रपट दाखवला होता. अफाट गर्दी असूनही त्या गर्दीतूनही त्यांनी स्वतः तिघांचेही तिकीट काढले होते. आता तो चित्रपट लक्षात नाही पण ही आठवण मात्र स्मरणात आहे. एखाद्या व्यक्तीला आपलंसं मानलं किते जीव ओवाळून टाकतात, अशी मला अनुभूती येत गेली. मराठवाडा विद्यापीठाचे नामांतर संबंधी दोन्ही सभागृहात बहुमताने ठराव पारित झाला असताना हा प्रश्न सतरा वर्षे विलंबित आणि लोंबकळत ठेवला. तो प्रत्येक आंबेडकर प्रेमींच्या जिव्हारी लागला. सरकार विषयीची तीव्र चीड आणि घृणा निर्माण होत होती. जिओ और मरो अशा निर्धाराने आंबेडकरी तरुण तळहातावर शीर घेऊन आपल्या परम पिता जगात विद्वान महापंडित महामानवाच्या नावासाठी शरणकुमार नोकरीत असतानाही नोकरीची अथवा जीवाची पर्वा न करता रस्त्यावर उतरले होते. कवी यशवंत मनोहर शरण कुमार लिंबाळेंना दुसरा

वर्ग संबोधतात. त्याचे दुःख दुहेरी आहे, कर्णाचे दुःख एकेरी आहे सुतपुत्र म्हणून त्याची पदोपदी अवहेलना होते. तो कुंतीच्या पोटी जन्माला आला असला अनॉरेस आहे. त्याच्या जन्मदाता कोण आहे हे त्याला ज्ञात नसते. तो आपले क्षात्रतेज दाखवत राहतो. सूर्यपुत्र म्हणून तो ओळखला जातो. विवाहबाह्य संबंधातून जन्माला आल्यामुळे शेवटी युद्धाचा प्रसंग पांडवावर असल्यामुळे कुंती स्वतःहून त्याची जन्मदात्री असल्याचे सांगून त्याला पांडवाच्या त्यांच्या भावांच्या बाजूने लढण्यास सांगते. तो तिचा धिक्कार करतो आणि त्याची उपेक्षा  जन्मभर होत असताना मातृत्व कुठे गेले असा प्रश्नाचा भडिमार करतो. शेवटी पांडवांना वाचविण्याचे अभिवचन देतो. अक्करमाशीचे विराट शरणकुमारचे दुःख तर आहेच. तसेच अस्पृश्यतेच्या वणव्यातील, दारिद्र्याच्या भुकेतील भाजून करपून काढणारे दुःख अनिवार अगणित असे आहे. इतर दलिताप्रमाणे त्यांना सोसाव्या लागतात. अक्करमाशी म्हणून अवहेलनेला तळ्यात तोंड द्यावे लागते. त्यामुळे त्यांनी भोगलेल्या दुःख, वेदना कुणाच्याही वाट्याला न आलेल्यांना कसे समजणार आहे? अक्करमाशी मुळे त्यांचे आणि त्यांच्या बहीणींचे सन्मानाने विवाह करून जीवन व्यतीत करावे म्हटले तरी ते कुठे जुळत नाहीत. आई महार जातीची आहे. ती लिंगायत पाटलाचे अंगवस्त्र म्हणून ठेवलेले आहे. आजी एक मुसलमान पुरुषाशी संबंध प्रस्थापित करते. आई अक्करमाशी अपत्यांना जन्म देऊन कुपाटीवर टाकते. ही मजबुरी आहे की परिस्थिती शिकार झाली आहे, की समाज व्यवस्थेची बळी आहेत?

ती वयात येतात. तेव्हा बारामासी स्वतःला संबोधणारे त्यांचा धिक्कार करतात. अनिवार्यता विवाह करणे काळाची गरज म्हणून अक्करमाशीच्या व्यक्तींचा शोध घेतला जातो. शरणकुमारच्या बाबतीत व्यसनाधीन मरीबा कांबळे दारूच्या बाटलीस कुसुम नावाच्या त्याच्या मुलीस रक्ताचे नाते जुळविण्यास संमती देतोच असे नाही, तर लग्नही लावून देतो. खऱ्या अर्थाने मरीबा दारुड्या असूनही जातीपातीतील हालकी भारी कुळाचा विचार न करता माणूस म्हणून जावयाचा स्वीकार करतो. विवाह लावून खरा बुद्धिस्ट ठरतो.

शरणकुमार स्वतःचा शोध घेतात. अंगावर तेजाब ओतल्याप्रमाणे भडकून उठतात. मी कोण? अक्करमाशी आणि बारामाशीचे प्रमाण काय? ज्यांनी त्यांनी जन्म दिलेल्या आईला विचारले जावे. अंधारातच मी मी म्हणणारे लब्धप्रतिष्ठितांचे

काळेबेरे धंदे चालत असताना त्यांच्या अपत्यांना बारामासी कसे समजावे? ज्यांची इज्जत, अब्रू उघड्यावर पडते. इज्ञतीवर घाला घातल्याने ते जन्मले, म्हणून ते अक्करमाशी का व्हावे? पशू समान का गणले जावे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात की जगातील कुठल्याच वंश शुद्ध स्वरूपाचा नाही. (Blue blood) योनी सुचिता हा एक थोतांड आहे. बकवास आहे.

इथूनच शरणकुमार पेटून उठतात. त्यांच्यासारख्या असंख्य परिस्थितीने गांजलेल्या, मजबुरीचा फायदा घेऊन आश्रप सुंदर पतिव्रतेच्या अब्रूवर घाला घालून त्यांच्या चिंध्या केल्या आहेत. हे सारे आकलन वयोपरत्वे होत असतानाही परिस्थितीजन्य स्थिती त्यांच्या ध्यानी आल्याशिवाय राहत नाही तो चिडून इतका क्रुद्ध होता की, यशवंत पाटलाच्या म्हाताऱ्यावर चढून आईच्या अत्याचाराचा बदला घ्यावा, अशी मनीषा व्यक्त करताना दिसून येतो. कर्णाप्रमाणे बलदंड क्षात्रतेज दाखवून स्वतः मधली तेजस्वी वीरता सिद्ध केली. तद्वतच शरणकुमार लिंबाळे स्वतः मधली प्रचंड रग आणि धग दाखवून विरत्वपणाला लावतात आणि अशी सामर्थ्यशालीन बौद्धिक आणि शारीरिक क्षमता उच्चवर्णीयांची मिरासदारी नव्हे, तर तळागाळातून वर आलेल्या कुठल्याही व्यक्तीच्या ठायी ती असू शकते. हे निर्भीडपणे दाखवून देतात. संधीचे सोने करून दाखवतात.

माझे हक्क सूर्यासारखे उगवत आहे
हा सुर्योदय तुम्ही नाकारणार का?
असा सवाल प्रस्थापितांना उद्देशून ते करतात.

त्यांच्याकडे प्रत्येक बाजूची सशक्त समर्थन करण्याची ऊर्जा आलेली आहे. ती त्यांच्या रंध्रारंध्रात सळसळते आहे. ते अगणित प्रश्न उभे करतात आणि प्रस्थापितांपुढे ठेवतात. हे प्रश्न इतके जटिल आहेत. जहाल वास्तववादी आहे की, संस्कृतीचा टेंभा मिरवणाऱ्या लंगड्या समर्थकांची दात खिळच बसवतात. त्यांचे केविलवाणे समर्थन लुळेपांगळे पडतात. ते बहुआयामी बहूप्रसवी लेखन करून रोख–ठोकपणे शड्डू ठोकतात आणि त्यांच्यो नाकावर टिचून मारतात. म्हणूनच त्यांचे लिखाण चौफेर आणि सर्वव्यापी झालेले आहे. दलित साहित्याची भलावण करणारे आदर्शवत माईलस्टोन आहे. यात संदेह नाही.

त्यांनी लोकसाहित्य प्रकारातील तमाशा विषयक प्रश्न उभा केला आहे. ही

कला अभिजात कला असून तळागाळातील लोक कलावंतांच्या प्रतिभेतून आलेली आहे. अर्थात कोणतीही कला ज्याच्या–त्याच्या अभिरुचीप्रमाणे चांगली–वाईट ठरत असते. ज्याच्याकडे अस्वादकाची क्षमता नसणाऱ्या अरसिकाला त्याचे कोडकौतुक कसे करावे वाटेल? ते जाणीवपूर्वक टिंगल टवाळी करत आलेले आहेत.

निर्भर्त्सना आणि तुच्छता दर्शवित आलेले आहेत. शास्त्रीय संगीतापेक्षा लोककला लाखपटीने उजवी लोकप्रिय झालेली आहे. ही कला तळागाळातल्या अस्सल अनुभूतीतून निर्मित झालेली आहे. ही कला लोकांची मनोरंजन तर करतेच रंजना बरोबर ज्ञान आणि प्रबोधनही करते. शास्त्रीय संगीत मूठभर लोकांचे आवडची तर लोककला ही ९७% बहुजनाची कला संबोधली जाते. ही विराट समाजाला डोळ्यासमोर ठेवून लिहिली जाते. सादर केली जाते. तिला मूठभराकडून सवंग प्रचारकी अभिरुचीहीन ठरवली जाते. 'कलेसाठी कला' ही धांदात मूर्खपणा वाटतो. कोल्हाट्याची पोरगी जीव ओतून लावणी सादर करते, तेव्हा तिला नाची म्हणवले जाते, मात्र लावणीवर माधुरी दीक्षित नाचली तर ती नृत्यांगना ठरते. म्हणून दोन्ही समाजातील अभिरुची विभिन्न असल्याचे शरणकुमार प्रतिपादन करतात. अशा या अरसिक वेडगळ मानसिकता धारण करणारांचे ते सताड डोळे उघडतात. त्यांच्या मनाचा उद्रेक होतो. स्फोट होतो. या विचारधारेतून त्यांच्या विविध ललित कलांची निर्मिती होते. ती पारंपरिकतेला तडीपार करते आणि दलित साहित्यरूपाने वेगळे तथा स्वतंत्र विश्व उभं करते. त्यांच्या स्वतःच्या व्यक्तिमत्व आणि व्यक्तिमत्त्वामध्ये ते वेगळा ठसा उमटवितात. त्यातून विशुद्ध मानवतेचे दर्शन घडवून आणतात. त्यामुळेच की काय त्यांच्या कलाकृतींचे देशी विदेशीय भाषेत अनुवाद करून आवडीने वाचली जातात.

शरणकुमार यांनी प्रस्थापित व्यवस्थेच्या वैदिककाळापासून ते आजतागायत विषमतावादी–जुलूम–जबरदस्ती विरुद्ध बंड करण्याचा जणू विडाच उचललेला आहे. त्यांनी आपली नाळ परिवर्तनवादी विद्रोही परंपरेशी जोडली आहे. मग ते चार्वाक असो, बुद्ध–कबीर–महावीर, गुरुनानक, रामानुजन, बसवेश्वर असो की महात्मा फुले, राजर्षी शाहू महाराज, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, पेरियार रामस्वामी नायकर असो या साऱ्या महान कारकांच्या आदर्शाचे प्रेरणास्थान संबोधले आहे. त्यातून सांस्कृतिक, धार्मिक, पुरोगामी–प्रतिगामी वैदिक–अवैदिक अशा परस्पर

विरुद्धी दोन संस्कृतीचा ते आकलनासह उकलनही करतात. तसा त्यातल्या आतल्या खदखदणारा ज्वालारस उफाळून तो प्रगट होत जातो. मग त्यांची लेखणी बंदूक तोफेनी बारूद भरावी तशी होत जाते. हल्ले प्रतिहल्ले करण्यासाती पुढे सरसावते.

ते दलित साहित्याची जोरकसपणे प्रचंड ताकदीने भलावण करतात आणि या साहित्याची पताका फडकवित राहतात. ते साहित्याचे गुण वैशिष्ट्ये सिद्धहस्त लेखणीतून साधार प्रगट करतात जसे–

१) दलित साहित्य हे दलितांच्या मुक्तीचे साहित्य आहे.

२) डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे क्रांतीचे नाव आहे. या क्रांतीचे प्रेरणास्थान हे साहित्य आहे.

३) हिंदी दलित साहित्य हे मराठी दलित साहित्याचे कलम आहे. या नेमीशराय यांच्या विधानाशी ते सहमत आहेत.

४) हे साहित्य आकार रुप गंध आशय / विषयशैली या सर्वांगाने सर्वस्वी भिन्न आहे. त्यातील सौंदर्यशास्त्रातील समीक्षा त्याच अंगाने होणे आवश्यक असल्याचे ते प्रतिपादन करतात. पूर्वापार आयात समीक्षा त्यास लागू होऊ शकत नाही. त्या रुपबंधातील मूल्य जाणूनच या साहित्याचे मूल्यमापन केले जाणे आवश्यक आहे.

अत्यंत व्यापकतेने आणि विस्ताराने दलित साहित्याचे स्वरूप ठोसपणे अभ्यासून ग्रंथीक साधनातून अहंमहमकीने ते मांडताना दिसतात. इतका सखोल आणि व्यापकतेने, व्यासंगाने बोटावर मोजणारे सोडले, तर हेच एकमेवाद्वीय ठरतात. त्यांनी मराठी दलित साहित्यासह हिंदी आणि इतर भाषिक तत्त्वचिंतक आणि समीक्षकांनी दलित लेखकांनी निस्पृहपणे आणि निर्लेपपणे केलेल्या अभ्यासकाचा तेवढ्या तोडीने परामर्श घेतलेला आहे. त्यांचे तगडे समर्थन विविध ग्रंथाच्या प्रस्तावनेतून दृष्यमान केले आहे. या साहित्यातील तोचतोचपणा आल्याचे विरोधाच्या म्हणण्याचे ते प्रभावीपणे खंडन करतात. दलित पँथर, दलित प्रेमकविता, भारतीय दलित साहित्य, दलित कथा, शतकातील दलित विचार यासारख्या विषयाला अनुसरून पुष्ठ संख्येचा विचार न करता, संशोधकवृत्तीने (ब्लकी बुक) हातात न मावणाऱ्या वजनदार/ ग्रंथातून साक्ष उभे करतात. हे साहित्य बहुगुणी, बहुउपयोगी सशक्त मानवी उत्थानासाठी आणि कल्याणासाठी उपयुक्त आहे, हे सिद्ध करून

दाखवतात दलित एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे कसे संक्रमित होत जाते, याचा ते आढावा घेतात. विविध उदाहरणे आणि संदर्भ देत ते विषद करतात.

त्यांच्या संपादनातून खालीलप्रमाणे निष्कर्ष काढता येईल.

१) यातून लेखनाचा गाढा अभ्यास होऊ शकला. तसा अनुभवही गाठीस जमा होऊ शकला. हा महत्त्वपूर्ण अभ्यासाअंती ऐतिहासिक दस्तऐवज उपलब्ध होऊ शकला. जो अभ्यासकांसाठी आणि भावी पिढीसाठी सन संदर्भ ग्रंथाचा खजिनाच म्हणून निर्मिती होऊ शकला.

२) हजारो वर्षाची जठील माणुसघाणी व्यवस्था खणून काढता आली. त्यासाठी त्यांनी वेळची, बुद्धीची आणि शरीराची क्षिती बाळगली नाही. जसे लिहावं असं सुचत गेले. तसं प्रचंड वेगाने, ऊर्जेने लिहीत गेले. भले मग हात, पाठ, मान कंबर दुखली. त्यांना जुमानले नाही.

३) लिहिणे मग ते ललित असो, वैचारिक असो हा त्यांच्या जीवनाचा अविभाज्य भाग बनला. लिहिणे हे नैतिक कर्तव्य भावनेचे अंग असल्याचे प्रतिपादन करतात. नाही लिहिले, तर तो अक्षम्य अपराध असल्याचे विशद करतात. हजारो वर्षाचा अनुशेष भरून काढला पाहिजे ही त्यामागची त्यांची भूमिका प्रतीत होते.

४) ते लिहितात म्हणजे डोळ्यात तेल घालून अहोरात्र जागल्याची जणू कामगिरी बजावतात.

५) लिहिताना जणू पेनचा उपयोग धारदार खंजीराचा जणू वापर करतात. शिवाजी महाराजांनी अफजलखानाचा वध त्यांच्या बिचव्याने यांनी केला होता. तसाच पारंपरिक व्यवस्थेची चिरफाड करून त्याचे पुतळे बाहेर काढतात. त्यांचे. दात त्यांच्याच घशात घालतात. धारदार शब्दशैलीचा उपयोग ठाईठायी केला गेला आहे. वास्तवतेचा आधार घेऊन ही शब्दसंपदा त्यांच्या प्रगल्भ जाणिवेतून साध्य झाली आहे. प्रा. डॉ. यशवंत मनोहर हे त्यांना 'शब्दसम्राट' अशी उपाधी देतात आणि त्यांच्या शब्दशैलीचा गौरव करतात. शब्दांना वाकवण्याची प्रचंड ताकद यांच्या लेखणीत आहे. पोलादाला जसे तापवून त्यावर घाव घातला जातो आणि पाहिजे तसा आकार दिला जातो, तसा शब्दाकारची क्षमता त्यांच्या ठायी आहे. विपुल शब्द भांडारांचा साठा त्यांच्याकडे आहे. मग ती ललित लेखनातील कथा–कविता असो की वैचारिक लेखनाची असो. शब्दसृष्टीतील ही त्यांची किमयागारीचे

वैशिष्ट्य आहे.

दलित साहित्य आणि रिपब्लिकन पक्षाची ते तुलना करतात. त्या साहित्याची महती विशद करताना ते भाष्य करतात. आर.पी.आय. ही राजकीय चळवळ त्यांच्या परंपरेत विचारांवर चालणारी, त्यांचे वारस म्हणून जे तथाकथित बडवून घेतात. पण या चळवळीला मूर्त स्वरूप यायला हवं होतं. ते पूर्णत्व येऊ शकले नाही. शासकीय जमात होण्याचं बाबासाहेबांचे स्वप्न साकार होऊ शकले नाही. जो तो स्वतःला प्रति आंबेडकर संबोधतो. त्यामुळे गटबाजी तुकड्या-तुकड्यानी आरपीआय बाबासाहेबांचे स्वप्न पार धुळीला मिळवले. हा पक्ष जातीच्या आणि मर्यादेच्या कुंपनात बंदिस्त करून 'धड मला ना तुला घाल कुत्र्याला' या म्हणीप्रमाणे पुरी वासालात लावली आहे. या उलट दलित साहित्य हे वंचित उपेक्षित जाती जमाती आदिवासी या घटकातील साहित्यिकांना प्रेरणा तर देतेच, तसेच स्वतःला सामावून घेते. एवढेच नाही, तर प्रागतिक लेखक-समीक्षक विचारवंत यांना मोठ्या सहिष्णुतेने दलितेतरांना सोबती घेण्याचे औदार्यही दाखविते. एवढ्या मोठ्या प्रमाणात रिपब्लिकन नेत्यांनी पुरोगामी नेतृत्वाचा अंगीकार केला नाही. या उलट वंचित उपेक्षित अल्पसंख्यांक जवळ न घेता दूर लोटल्याचे पाप केले आहे. त्यामुळे रिपब्लिकन राजकीय चळवळ एखाद्या शिलेदाराप्रमाणे ठोकरा खात अलगतावादी राहिली, असा या दोन्ही चळवळीचा भेद शरणकुमार स्पष्टपणे करताना दिसतात दलित साहित्य व्यापक आणि विशालतत्व साध्य करत आकाशव्यापी झेप घेते. तर रिपब्लिकन पक्ष कोंडलेल्या, सडलेल्या डबक्यात लिडबडत राहते. डुबक्या मारत राहते.

दलित साहित्याची घोडदौड चालूच आहे. या साहित्याला स्वतःचा असा चेहरामोहरा लाभलेला आहे. त्याच्या भिन्नतेमुळे स्वतंत्र ठसा उमटवलेला आहे. त्याचे वेगळे परिणाम लाभलेले आहे. ते अभिव्यक्त करण्यासाठी आक्रमकपणे आणि सशक्त ताकदीने ते सिद्ध करून दाखवतात. त्याची जोरकसपणे पाठराखण करतात. या साहित्याची व्यापक जाणीव करून घेणे, त्यातील सौंदर्य उलगडून घेता येऊ शकते. त्यांना याचे मूल्यमापन आणि भाष्य करण्याचा लोकशाही अधिकार पोचू शकतो, अशी शरणकुमार यांची या साहित्याविषयाची पार्श्वभूमी आहे. त्यासाठी ते विविध माध्यमाद्वारे हिरीरीने वापर करतात. सिद्ध करू पाहतात असा प्रांजळ प्रयत्न

त्यांनी केला आहे.

शरणकुमार लिंबाळे यांनी कुठल्याच बाबतीत लपवाछपवी केली नाही. जे जीवनात जे घडलं ते विनासंकोचपणे आणि रोख–ठोकपणे लिहिले. त्यांची धम्मपत्नी त्यांना म्हणते, 'कशाला असे लिहिता? त्यामुळे आपल्या लेकरा बाळाच होया जायाचं लेखक असा असावा की त्याने आपल्या जीवनाशी प्रतारणा करणारा नसावा. आपल्या अनुभवाशी एकनिष्ठा आणि प्रामाणिक असला पाहिजे लिहिण्या वागण्यात महद्अंतर राहिले, तर वाचकांची त्या लेखकाविषयी श्रद्धा उडून जाते. त्यांनी स्वतःच्या वैयक्तिक जीवनाविषयी तर आडपडदा ठेवला नाही तसेच प्रस्थापिता विषयी लिहितानाही कचरले नाहीत. निर्भीडपणा उजागर करीत राहिले. असा मित्रत्वाचा माणुसकीचा आदर्श त्यांनी मला दाखवून दिला.

आता त्यांची स्वकष्टाने केलेल्या कामाईमुळे परिस्थिती सुधारली आहे. ते टोलेजंग बंगल्यात राहतात. मला कधी मोबाईल करताना म्हणतात के. व्ही. तुमची मुक्काम करताना मुळीच कुचंबना होणार नाही. स्वतंत्र खोलीत तुम्हाला मुक्काम करता येईल. कधी येता बोला.'' मला काही त्यांच्या बार्शी आणि पुणे येथील टोलेजंग बंगल्यात मुक्कामच काय पण बघणे देखील झाले नाही. एवढा मोठा पुरस्कार मिळाला तरी गडी वर हुरळून गेला नाही. उलट मी त्यांचे पुरस्कार लाभल्यानंतर अभिनंदन केल्यानंतरचे स्वीकारला आणि ते मला उलट म्हणाले, 'मी पुण्याहून बार्शीला आलो.' म्हणजे तुम्हाला मोबाईल करून कळंबला येईन तेव्हा तुम्ही तरी या किंवा मी तरी येईल. इतक्य वर्षाच्या राहिलेल्या गप्पांचा गॅप भरून काढता येईल.

माझ्याप्रमाणेच अनेक त्यांच्या चाहत्यांनी लेख, त्यांना मिळालेल्या पुरस्कार संबंधी गौरवार्थ लेख लिहिले आणि त्यांच्यावर स्तुतिसुमनांची उधळण केली. कु. सरोज चंदनवाले यांनी दैनिक सकाळमध्ये 'अक्कलकोटचा सुपुत्र' या शीर्षकाखाली मार्मिक लेखनातून त्यांचे मत अभिव्यक्त केले आहे. त्यांनी हाच पुरस्कार मिळालेल्या तीन लेखकांची तुलना शरणकुमारशी केली आहे. कोणीही आपल्या जन्मभूमी विषयी अभिमान बाळगत असतो. तो बाळगणेही रास्तच असतो. अभिमान बाळगावा असे कोणाला का सांगावे लागते. ते अभिमानाचे आणि भूषणावह असते तसे लिंबाळे हे या जन्मभूमीविषयी नितांत श्रद्धा आणि कृतज्ञता व्यक्त करतात. ते

त्यांच्या आठवणी अंतर कप्प्यात साठवून ठेवतात. हन्नुर अक्कलकोट, चपळगाव आणि सोलापूर यांनी त्यांना जागवले. घडवले. पोटाची भूक भागवली, माणसात आणून मान सन्मानाने सुरुवात तिथूनच झाली. या ऋणानुबंधाचा त्यांना विचार कधी पडला नाही. मात्र आजवर मिळालेल्या या तिघांना आपल्या राहता जन्मस्थळाचा नामोल्लेख टाळल्याचे नमूद करतात. शरणकुमार आपल्या मायभूमीला विसरले नाहीत. यातच त्यांचे ककवढे मोठे उत्तरदायित्व सामावले आहे हे सिद्ध होते. असे विधान करून त्या पुढे लिहितात अक्कलकोट हे तीर्थक्षेत्र आहे. आता हे साहित्यक्षेत्र म्हणूनही ओळखले जाईल. असा मुक्तकंठाने गौरव करीत शेवटी लिहितात, ‘स्वामी लिंबाळे यांचा विजय असो’ जयजयकारही करतात. मी या मित्राला माझ्या दीर्घायुष्य लाभो व त्यांना सुखी समाधानी कौटुंबिक सुखी, आनंदी आणि समृद्धीचे जीवन जगता यावे असे अभिष्टचिंतन करतो त्यांच्या हातून यापेक्षाही श्रेष्ठ दर्जाच्या कलाकृतींची निर्मिती होवो आणि ते पुढे नोबेल पारितोषिकाचे मानकरी ठरो, अशी अभिलाषा व्यक्त करतो आणि थांबतो.

ISSN 2249-0817 WARUL

# दलित समाजाची वेदना व स्वदुःखाची निर्भीड,निर्लज्ज मांडणी करणारे आत्मकथन : अक्करमाशी

– **प्रमोद गारोडे,** अमरावती

१९६० नंतर मराठी साहित्यामध्ये दलित वेदना व विद्रोहाचे साहित्य लिहिले जाऊ लागले. याला कारण डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारप्रेरणेने दलित समाज प्रेरित होऊन जागा झाला होता. त्यांनी सर्वहारा दलित समाजाला 'स्व'ची जाणीव करून दिली. आत्मशोध घ्यायला शिकविले अन् जी व्यवस्था आपल्यावर अन्याय–अत्याचार करते. त्या व्यवस्थेविरूद्ध 'विद्रोह' करायला लावला. जी व्यवस्था आपले 'माणूसपण' नाकारते, आपले 'अस्तित्त्व' नाकारते, आपला 'स्वाभिमान' नाकारते ती व्यवस्थाच आपण नाकारली पाहिजे हा आत्मस्वर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दिला. या आत्मस्वरातूनच पहिल्या पिढीचे दलित साहित्यिक लिहू लागले. आपल्या वेदनेला, शोषणाला शब्दरूप देऊ लागले. ही अभिव्यक्ती सर्वप्रथम कवितेतून झाली, पुढे कथा अशी होत होत 'आत्मकथन' या विस्तीर्ण अन् प्रखर वास्तवदर्शी साहित्य प्रकाराद्वारे होऊ लागली. दलित आत्मकथनाने दलित वेदना अतिशय परखडपणे मांडली. ही मांडणी भयानक व वास्तववादी असल्यामुळे सारे साहित्यविश्व हादरून गेले. या सर्वहारा दलित साहित्यिकांनी आपल्या दलित समाजाची वेदना आपल्या आत्मकथनातून मांडून प्रस्थापित व्यवस्थेविरूद्ध वैचारिक विद्रोह पुकारला. या वैचारिक विद्रोहातील एक लेखक म्हणजे शरणकुमार लिंबाळे हे होय. त्यांनी आपल्या 'अक्करमाशी' या आत्मकथनातून आपल्या दलित समाजाची वेदना व 'अक्करमाशी' म्हणून वाट्याला आलेल्या आपल्या दुःखंभोगाची निर्भीड मांडणी केली आहे. स्वतः लिंबाळे म्हणतात त्याप्रमाणे 'आत्मकथा लिहितांना पूर्णपणे निर्भय आणि निर्लज्ज होणे महत्त्वाचे असते. या निर्भीड, निर्भय आणि निर्लज्ज मांडणीची सविस्तर चर्चा या लेखात करण्याचा प्रयत्न मी केला आहे.

डॉ. शरणकुमार लिंबाळे यांचे 'अक्करमाशी' हे आत्मकथन १९८४ साली प्रकाशित झाले आहे. वयाच्या पंचविशी पर्यंतचा जगण्याचा भयानक पट लेखकाने या

आत्मकथेत मांडला आहे. त्यांचे हे मांडणे वाचकाला जर मनाच्या पातळीवर गोठवून टाकते, सुन्न करते तर प्रत्यक्षात लेखकाचे जगणे किती वेदनादायी व उद्ध्वस्तपणाची जाणीव करून देणारे असेल याची कल्पना आल्याशिवाय राहत नाही. आपल्या आत्मकथन निर्मितीच्या संदर्भात शरणकुमार लिंबाळे मनोगतात लिहितात,'' 'Who I am?' हा निग्रोसारखाच Identification चा प्रश्न मलाही सतत सतावणारा. 'मी सवर्ण की अस्पृश्य?', 'मी कोण?' या प्रश्नातून ही आत्मकथा पूर्ण झाली. मी 'अक्करमाशी' म्हणून, मी 'अस्पृश्य' म्हणून, मी 'दरिद्री' म्हणून जे जीवन जगलो, तेच शब्दात मांडले आहे. ही आत्मकथा जशी माझी आहे, तशी मी ज्या समाजात वाढलो आणि ज्या गावात जगलो त्यांचीही आहे. मी जे जगलं, भोगलं, अनुभवलं आणि बालपणापासून पाहात–ऐकत आलो तेच या आत्मकथेत आहे. मी बालपणी जे ऐकलं ते आजही माझ्या मनावर ताज्या जखमेसारखं आहे म्हणूनच ते शब्दातून भळभळत वाहिलं आहे. मी भूतकाळाकडे मांजरडोळ्यानं पाहिलं, शेवटच्या स्मृति क्षितिजापर्यंत न्याहाळलं आहे. जे आठवलं, सांगावं वाटलं ते सांगितलं आहे.'' लेखकाने आपलं व आपल्या कुटुंबाचं जगणं किती भयावह व वेदनादायी होतं याचं अतिशय स्पष्ट शब्दात व निर्भीडवृत्तीने चित्रण या आत्मकथेत केलं आहे.

'अक्करमाशी' आत्मकथनाच्या संदर्भात डॉ. जनार्दन वाघमारे लिहितात, ''प्रत्येक दलित आत्मकथा ही एक प्रकारची दुःखयात्राच असते. दलितांच्या आयुष्याच्या मार्गावर रोवलेला प्रत्येक दगड हा केवळ दुःखाचेच अंतर सांगतो. खरे तर त्यांच्या आयुष्याच्या वाटा मरणप्रदेशातून निघालेल्या असतात. त्या मरणप्रदेशाला ओलांडल्यानंतरचा प्रवास सुखाचा असेल एवढ्याच आशेवर त्यांना चालत राहावे लागते. पण त्यांच्याभोवती पसरलेला मरणप्रदेश एवढा प्रचंड व विस्तीर्ण असतो की तो त्यांना ओलांडता येणे शक्य नसते.'' असे असले तरी हा विस्तीर्ण मरणप्रदेश ओलांडण्याचे धाडस शरणकुमार लिंबाळे यांनी केले असल्याचे आज सिद्ध झाले आहे. एक अनौरस मूल ते प्रथितयश प्राध्यापक, विद्यापीठाचा संचालक व साहित्यिक म्हणून त्यांनी स्वतःला सिद्ध केले आहे.

'अक्करमाशी' या आत्मकथनात दोन स्तरावरची जीवघेणी वेदना आली आहे. एक म्हणजे दलित म्हणून सोसावी लागणारी मरणयातना आणि दुसरी 'रांडेचा पोर' म्हणून होणारी अवहेलना. 'अक्करमाशी' म्हणून जन्माला आल्याची वेदना. या

दोन स्तरावरील जगण्याचा संघर्ष, यातना व वेदना या आत्मकथनाचा गाभा आहे. आपल्या वेदनादायी जगण्याबद्दल लेखक मनोगतात अतिशय स्पष्टपणे व निर्भीडपणे लिहितात,''महारोगाचा चट्टा लपवून ठेवावा, तसं हे जीवन लपवून ठेवावं वाटायचं. मला माझा इतिहास माझ्या आईपुरता सांगता येईल. जास्तच झालं तर आईच्या आईपुरता यापलीकडं मला माझं कुळ नाही.(मनोगत/पृ.–पाच)....माझी आई महार, तर वडील लिंगायत. आई झोपडीत, तर बाप माडीत. वडील जमीनदार, तर आई भूमिहीन. मी अक्करमाशी. गाव, भाषा, आई, वडील, जात, धर्म या सर्वच बाबतीत मी दुभंगलेला. व्यक्तिमत्त्व हरवलेला. माझ्या अस्तित्वाला अनौरस म्हणून हेटाळलेलं. ब्राम्हणापासून शूद्रांपर्यंत प्रत्येकजण स्वतःच्या घराण्याचा अभिमान बाळगत असतो. घरंदाजता मिरवत असतो. पण माझ्या अस्मितेवर बलात्कार केलेला आहे. बलात्कारित स्त्रीसारखं हे जीवन. इथल्या नीतीनं मला गुन्हेगारासारखं वागवलं. माझा जन्मच अनैतिक ठरवला गेला.(मनोगत/पृ.– सहा)...प्रत्येक गावात पाटील जमीनदार असतात. त्यांची रांड असते. या रांडेच्या मुलांच्या व्यथा लोकांना कळल्या पाहिजेत. हे सांगण्यासाठी मला आत्मकथाच जवळची वाटते. (मनोगत/पृ.–सात) 'अक्करमाशी' म्हणजे अकरा मासे. बारा माशाचा एक तोळा होतो. अकरा माशांचा तोळा होऊ शकत नाही. कारण एक मासा कमी असतो. 'अक्करमाशी' माणसाचंही असंच आहे. त्याचा जन्म विवाहबाह्य संबंधातून झालेला असतो.... मी 'अक्करमाशी' या माझ्या आत्मकथनाकडे एक कलाकृती म्हणून पाहात नाही, ही कैफियत आहे. या पुस्तकाकडे सामाजिक अत्याचाराची एक घटना म्हणून पाहावे हा हेतू आहे.(मनोगत/पृ.–आठ) ''ह्या जीवघेण्या यातना लेखकाने अतिशय निर्भीडपणे आणि कुठलाही आडपडदा न ठेवता जशा आहे तशा भविष्याचा कुठलाही विचार न करता अधोरेखित केल्या आहेत. त्यांच्या या प्रखर वास्तवचित्रणामुळे त्यांना अनेकदा अपमान व वेदना सहन कराव्या लागल्यात. अनेकांनी त्यांना बरे वाईट शब्दात सुनावले. लोकांनी आरोप केले आहेत याची साक्ष ते स्वतः मनोगतात देतात. '' 'अक्करमाशी लिहून लिंबाळेनं दलित समाजाची बदनामी केली आहे.' असा एक सूर ऐकतो आहे. तेच ते महारांचे जीवन, जनावरे ओढणे, फाडणे, बकाल वस्त्या याचा समाजाला काय उपयोग? हे लिहिलं नसतं तर बरं!' असं काहीजण सांगतात, तर 'समाजाच्या वाईट प्रथा आणि घाणेरडं जीवन याबद्दल लिहून तुम्ही प्रसिद्धी मिळविता' असं काहीजण सुनावतात. 'तुमचं

लेखक म्हणून नाव होतं आणि समाजाची बदनामी होते. दलित स्त्रियांवर बलात्कार होतो, असं दलित लेखकांनी लिहू नये' असं या मंडळींचं म्हणणं असतं.'' आपल्याच समाजातील लोकांनी आपलेच दुःखं मांडले तर वाईट वाटते, आपले शोषण मांडले तर अपमान वाटतो. याची तीव्र प्रचिती लेखकाला आत्मकथन प्रकाशित झाल्यानंतर आली आहे. स्वाभिमानाचे मूल्य सोडून समाज सहानुभूतीतून आपल्या दुःखावर सुद्धा बोलत नाही, आपले शोषण, अत्याचार मांडणे हे लोकांना कमीपणाचे वाटते याची खंत लेखकाने मनोगतात व्यक्त केली आहे. ''दलित वाचकाला दलित आत्मचरित्र आपल्या समाजाची अब्रू चव्हाट्यावर मांडणारी वाटतात'' परंतु या दलित लेखनाकडे कोणत्या दृष्टीने पाहावे हे सांगायला सुद्धा लिंबाळे विसरत नाही. ते म्हणतात, ''मध्यमवर्गीय वाचकांनी देखील हे वाचलं पाहिजे. त्याशिवाय त्यांना दलित समाजाचे प्रश्न कसे कळणार? लोकांना व्यथा-वेदना कळाव्यात; म्हणून तर आम्ही लिहितो. आम्ही आमच्या पुस्तकांकडे प्रबोधनाचं माध्यम म्हणून पाहतो''जो पर्यंत 'अक्करमाशी'मधून आलेले प्रश्न समाजाच्या ऐरणीवर येणार नाही, त्याची चर्चा होणार नाही तोपर्यंत हे प्रश्न सुटतील कसे? हा खरा प्रश्न लिंबाळे यांच्या आत्मकथन लिखाणाचा मुख्य उद्देश आहे. असेही जीवनभोग माणसाच्या वाट्याला येतात याची जाणीव समाजाला झाली पाहिजे हा या आत्मकथनाचा गाभा आहे. हे जीणं चव्हाट्यावर आल्याशिवाय ते संपणार नाही हा विश्वास लेखकाच्या मनोगतातून व्यक्त होतो. हा विश्वास त्यांच्या जगण्यातूनही सिद्ध झाला आहे. म्हणून डॉ. भालचंद्र नेमाडे या 'अक्करमाशी' आत्मकथनासंदर्भात लिहितात, ''ज्या निखाऱ्यासारख्या प्रसंगातून ही आत्मकथा व्यक्ती आणि समाज यांच्यातलं अंतर जाळत जाते, ते लहान-सहान प्रसंग शेवटी धगधगते अस्तित्व निर्माण करून आश्चर्यकारक आकार निर्माण करतात, शरणकुमारवर कधी स्वतःचं अस्तित्त्व ठासून मांडायचे प्रसंग येतात, स्वतःची अस्मिता रक्षण करण्याची पाळी येते, तेव्हा तो स्वतःचं वर्णन करतो 'म्या निवडुंगासारखा हुभा रायाचा.' हे निवडुंगाचं प्रतीक त्याचं सगळं उपेक्षित जगणं तरीही टिकून राहणं, निव्वळ माणूस म्हणून जगण्याची आश्चर्यकारक हिम्मत दिमाखानं व्यक्त करतं. हा दिमाख आधुनिक विश्वसाहित्यातही उठून दिसेल असा अभिजात आहे.''

भुके संदर्भात चिंतन मांडतांना शरणकुमार लिंबाळे लिहितात, ''भाकर माणसाएवढी. भाकर आभाळाएवढी. भाकर सूर्याएवढी प्रखर. भूक माणसापेक्षाही मोठी. भूक सात

पाताळापेक्षाही दांडगी. माणूस भाकरीएवढा, भुकेएवढा. पोट माणसापेक्षाही दांडगं. एक पोट म्हंती पृथ्वीपोट असतं ईतभर, पर सारं जग गिळून ढेकर दील. पोट नसतं, तर कशा झाल्या असत्या लढाया, चोऱ्या, मारामाऱ्या? पोट नसतं, तर कसे झाले असते पाप–पुण्य, स्वर्ग–नरक आणि ईश्वराची निर्मिती? पोट नसतं, तर झालाच कसा असता देश, सीमा, नागरिक आणि संसद, घटना वगैरे? पोटातून तर जन्मले जग. जगाचे संबंध. आई–बाप, बहीण–भाऊ वगैरे वगैरे''

शरणकुमार लिंबाळे यांनी 'अक्करमाशी' मधून येथील समाज व्यवस्थेकडून होणारा अपमान व पोटाची आग बुझविण्यासाठी करावी लागणारी वणवण अशा 'भुके'चे चित्रण जागोजाग केले आहे. येथील बुरसटलेली समाजव्यवस्था जन्माने दलित असलेल्यांना प्रत्येक ठिकाणी कशी अपमान जनक वागणूक देते याचे चित्रण या आत्मकथनाच्या पहिल्याच प्रसंगामधून आले आहे. शाळेचे विद्यार्थी वनभोजनाकरिता जातात. त्यावेळचा प्रसंग रेखाटतांना लेखकाच्या बालपणी घडलेल्या प्रसंगाचे चित्रण आले आहे.''वान्या–बामनाचे, मारवाडी–मुसलमानाचे, तेल्या–कोळ्याचे, सोनार–मराठ्यांचे शे–दोनशे पोरवं, मास्तरं, पोरीवां येका वडाच्या झाडाखाली जेवाय बैसले–गोल पंगतीत तर आमी महार–मांगाची पोरं येका झाडाखाली... आमचं झाडंबी फाटकं व्हतं आमच्यावानी. वाऱ्यानं फांद्या हलल्या, की उन्हानं तोंडावर वारा घालावा. झळा लागायच्या. फाटक्या सावलीत आमी बसल्तो.'' येथून ही अवस्था दलित मुलांच्या वाट्याला आलेली दिसते. एकाच वर्गात किंवा एकाच शाळेत शिकत असून सुद्धा केवळ जन्माने दलित म्हणून होणारी अवहेलना व अपमान या प्रसंगातून व्यक्त होतो. इतकेच नव्हे तर पुढे हे प्रस्थापित व्यवस्थेचे ठेकेदार सवर्ण मुलांच्या डब्ब्यातील उष्टे अन्न गोळा करून आणून देतात. हे सांगतांना लिंबाळे लिहितात, ''गावातले पोरवं, मास्तर जेवत हुते.... जेवण झालं. अनेक पोरावांच्या भाकरी उरल्या हुत्या. मास्तरनं उरलेलं सगळं अन्न कागदावर जमा कराय सांगितलं, आन् ते आमाला दिलं.'' ही अगतिकता व हे अपमानकारक जगणे लेखकाच्या वाट्याला लहानपणापासून सातत्याने आले आहे. हे अपमानकारक चित्र पाहून मन सुन्नं होतं. परंतु ज्या समाजव्यवस्थेने त्यांच्या वाट्याला हे जगणं आणलं, त्यांना मात्र त्याचे काहीच वाटत नाही. याची खंत लेखकाला वाटते, या वाटण्यातूनच लेखकाने या समाजव्यवस्थेविषयी अनेक प्रश्न या आत्मकथनातून निर्माण केले आहे. ''वर्णाधिष्ठीत व्यवस्थेमुळे निर्माण झालेली सामाजिक

विषमता आणि मानवनिर्मित वंशशुद्धीच्या भ्रामक समजुती यामुळे माणसावर होणाऱ्या अन्यायाचे चित्रण या आत्मकथनात येते. अक्करमाशी म्हणजे अनौरस संतती. समाजमान्य स्त्री–पुरूषसंबंधातून जन्मलेले औरस किंवा बारामासेत्तर अशा नीतीबाह्य शरीरसंबंधातून जन्मलेले अकरमासे. अशुद्ध असे मानले जाते. बाप लिंगायत आणि आई महार या जातीची असणाऱ्या शरणकुमार यांना लिंगायत आणि महार या दोन्ही जाती दूर लोटतात. रांडेचा पोर म्हणून समाजाकडून कुचेष्टा होते. अस्पृश्यता, दारिद्रशोषण आणि अपमानाचे दुःखं पचविणाऱ्या लिंबाळेंना समाजाकडूनही अवहेलना सहन करावी लागते. अक्करमाशी आत्मकथनाची सुरूवात शाळेच्या सहलीत घडलेल्या प्रसंगाने होते. सवर्ण मुलांच्या डब्यात उरलेले अन्न शरणकुमार फाटक्या कपड्यात बांधून घरी आणतो. हे भुकेचे रौद्र रूप वाचकाला अस्वस्थ करते. मृत जनावरांचे मांस आणि शेणातील ज्वारीच्या दाण्याची भाकर खाऊन, दगड फोडणाऱ्या वडाऱ्यांची भाकरी चोरून पोटात उसळलेली भुकेची आग शरणला शांत करावी लागली आहे. या आत्मकथनातून येणारे भुकेचे चित्र हेलावून सोडणारे आहे. पोटासाठी शरीर विकणाऱ्या मसामाय, संतामाय, नागी यांचे दुःखंही येथे मांडलेले आहे. भुकेचा प्रश्न सोडविण्यासाठी दलितांना करावा लागणारा संघर्ष लिंबाळे यांनी समर्थपणे रेखाटलेला आहे.''

'अक्करमाशी'तून शरणकुमार लिंबाळे यांनी जागोजाग पोटाच्या प्रश्नाचे वास्तवदर्शन घडविले आहे. 'भूक' माणसाला काय–काय करायला लावते याचे चित्रण अनेक प्रसंगातून केले आहे. टिचभर पोटाच्या भुकेसाठी माणसं किती लाचार होतात, त्यांना तसं व्हावं लागतं याचे मनविदीर्ण करून टाकणारे चित्रण लेखकाने या आत्मकथनात केले आहे. त्याची काही उदाहरणं येथे सांगता येतील –

१. ''सुगीच्या दिसात जनावरं शेत चरायाचे. ज्वारीचे कणसं खाऊन दाणं हागायाचे. शेणात फुगलेले पिवळेधम्म दाणे असायाचे. दाणं असलेलं शेण संतामाय वटीत घेयाची. घरला निगताना वाटंत नदी लागायची. नदीत आमी ते शेण धुवायाचो. शेण निघून जायाचं, दाणं दाणं राहायाचं. तांदळाच्या दाण्यासारखे. संतामाय वाळून दाणे वाळवायची. दाणे वाळल्यावर थोडे  व्हायाचे..... संतामाय घरात आल्यावर ते दाणं जात्यात घालायाची आन् गाणं म्हणत दळायाची...... शेणातल्या दाण्याची भाकर धपाटीवानी दिसायची. संतामाय मला ती देयाची न्हाय. म्या त्या दिशी भांडून घितलो. कोरभर कुटका तोंडात घातलो. कचाकचा चावलो. भाकरीचा शेणकुट वास येत व्हता. गिळता गिळवत न्हौतं.''(पृष्ठ–२७ व २८)

२. 'मडं मसनवाट्यात नेयाच्या अगूदर रस्त्यात खांदेकरी मडं इसाव्याला टेकवतात. मड्याला इसावा देतात, आपुनबी इसावा घेतात. मडं जिथं इसाव्याला ठिवलं हुतं, तिथं वटीभर जवारी, पाच पैसे टाकून लोकं पाया पडल्ते. मला इसाव्याच्या जवारीचा ढीग बोलवत हुता. म्या मड्यामागं गेलो न्हाय. म्या तो जवारीचा ढीग वटीत घितला आन् घराकडं वाऱ्यावानी धूम ठोकलो..... वाटत हुतं, असे रोज श्रीमंताची मडी निगावीत. पैसे उधळावेत. मला तितकेच पैसे मिळत्याल. इसाव्याची जवारी मिळंल.' (पृष्ठ–२९)

३. 'उपासमार पाचवीला पुजलेली. सगळ्या भैनी उपाशीच निजायाच्या. त्येंना जेवाय कोनबी उठवायाचं न्हैय, कारण भाकरीच नसायाच्या. भैनी तशाच निजायच्या. घास मुटका आमी खायाचो. माय घळघळा पाणी पियाची. काका बिडी वढून भूक जाळायाचा. म्या उपाशी निजलेल्या भैनीवाकडं बगायचा. झोप उडून जायाची. तहान–भूक हारपायाची. आपल्या घासातला घास भैनीवाला द्येवावं वाटायाचं.' (पृष्ठ–३६)

''भोसडीच्या, लिव्हं की, बैल खाता येतं का? तंबाखू खात खात तिरस्काराने अंगावर फेकलेल्या मास्तराच्या या प्रश्नाचे उत्तर शरणकुमार देऊ शकत नव्हता...... शरणकुमारचे आत्मकथन वरील प्रसंगाने आरंभ होते. अशा प्रसंगाची मालिका त्याच्या पुढील आयुष्यात उभी होती हे सांगण्याची आवश्यकता नाही. त्यातील काही प्रसंग या आत्मकथनात सांगितलेले आहेतच. आणि ह्या प्रसंगांच्या मागे अगतिकता उभी असलेली दिसेल. विशेषतः भूक तर या मुलाचा सततच पाठलाग करते. प्रत्येक अस्पृश्य मुला–मुलीला भुकेने निर्माण केलेला अनन्वित छळ सोसावाच लागतो. भूक ही माणसाला लाचार बनविते, याची जाणीव शरणकुमारला लहान वयातच झालेली होती. भूक शमविण्यासाठी घरी ज्वारीचा दाणा कुठून असणार? मग करणार काय? भीक मागणे हा जवळचा मार्ग. गावात एखादे लग्न असेल, तर त्या लग्नघरातील लोकांपेक्षा महारवाड्यातील लोकांनाच अधिक आनंद वाटायचा. दोन दिवस पोटा–पाण्याची सोय झाली म्हणून त्यांना आनंद व्हायचा. लाख अपमान गिळून पोटाची खळगी भरण्याची संधी मिळायची. 'देवानं पोट दिऊन चूक केलीय' असं शरणकुमारला वाटायचं. तो सांगतो, 'लगीनघराजवळ हातात पोट घिऊन उभा राहायचो, तिष्ठित. महारड्याला कवा आवताना देत्याल त्येचा इच्चार करीत.'

भूक माणसाला जनावराच्या शेणातून ज्वारीचे दाणे काढायला लावते, भूक

माणसाला प्रेताच्या इसाव्याचे धान्य उचलायला भाग पाडते, भूक माणसाला जनावरं सोलायला भाग पाडते, भूक माणसाला किती अगतिक करते, काय काय करायला लावते याचे भयावह चित्रण लेखकाने याठिकाणी केले आहे. ''शरणकुमार लिंबाळे यांची 'अक्करमाशी' ही आत्मकथा त्यांच्या अनुभवांची आणि आयुष्याची मांडणी करत नाही, तर अक्करमाशी ही एक विदीर्ण अवस्था, अंतरंग उलगडून दाखविलेली जीवनगाथा आहे. हे आत्मकथन विचार करायला भाग पाडते. सुन्न करते. बुरसटलेल्या समाजव्यवस्थेविषयी घृणा निर्माण करते.''

'अक्करमाशी' या आत्मकथनातून लेखकाने आपल्या आईला, आजीला व बहिणीला जगावे लागलेले उपेक्षेचे व लैंगिक शोषणाचे जीवन किती खालच्या पातळीवरचे होते. याचे अत्यंत प्रांजळपणे चित्रण केले आहे. इतके निर्लज्ज व निःसंग होऊन मांडलेले आपल्याच मायबहिणीचे जीवन मराठी साहित्यात विरळेच. लेखकाने या आत्मकथातून आपल्या आईच्या जीवनाचा पंचनामा केला असला तरी तो पर्यायाने लेखकाच्या जगण्याचाही पंचनामा आहे. असे असले तरी हे स्त्रीचे प्रस्थापित व्यवस्थेकडून होणारे शोषण लेखकाने अतिशय परखड व कुठलाही आडपडदा न ठेवता मांडले आहे. ते वास्तव आहे. वाचकांसाठी व समाजासाठी ते निर्लज्ज असेल; परंतु लेखकासाठी ते दुःखंदायी, वेदनादायी व मन विदीर्ण करणारे, जगणे उद्ध्वस्त करणारे वास्तव आहे हेही तेवढेच सत्य आहे. दलित स्त्रियांच्या शोषणाला, व्यथा–वेदनांना वाचा फोडणारे हे आत्मकथन असून यातून आलेले स्त्रीजीवन सुन्नं करणारे आहे, अंगावर शहारे उभे करणारे आहे. घरच्या आर्थिक परिस्थितीचा, गरिबीचा फायदा घेऊन समाजात प्रतिष्ठिततेचा बुरखा पांघरलेले लोकं स्त्रीचा कसा गैरफायदा घेतात याचे प्रांजळ चित्रण लेखकाने येथे केले आहे. ''घरातील काळीज गोठवून टाकणारं, भीषण, जीवघेणं दारिद्र्य आणि अज्ञान, आणि दुसरीकडे उदरनिर्वाह साधनांची अभावग्रस्तता, निराधारत्व आणि जगण्याची उर्मी, या ताणांचा फायदा घेऊन गावातील पाटलासारखे दलितेतर दलित स्त्रियांना 'सामाईक मालमत्ता' म्हणून वापरतात, भोगापुरत्या. तथापि त्या दलित स्त्रीच्या स्त्रीत्वाचे वा तिच्या भविष्यकालीन निर्वाहाचे कोणतेही आधार तिला लाभू देत नाहीत. भोगापुरती दलित स्त्री, पण हक्कदानासाठी नाही. आणि एका पोटाशिवाय ज्यांच्याकडे काही काहीच नाही, त्या स्त्रियांचे दुःख समाजाला कधी दिसलेच नाही. 'प्रत्येक गावात पाटील–जमीनदार

असतात, त्यांची 'रांड' असते. या रांडेच्या मुलांच्या व्यथा लोकांना कळल्या पाहिजेत, हे सांगण्यासाठी मला आत्मकथाच जवळची वाटते.' असे लिंबाळे आपले मनोगत सांगतात. याचा अर्थ 'अक्करमाशी' हे असेच दुःखाचे प्रतिनिधीत्व करणारे हे एक जबरदस्त पुस्तक आहे.''

शरणकुमार लिंबाळे यांनी 'अक्करमाशी'मधून स्त्री जीवनाची भयानकता आपल्या जगण्यातून, अनुभवातून मांडली आहे. हे सारं मांडतांना लेखकाला असीम दुःखं होते, परंतु ते मांडले तरच ही वेदना, हे शोषणाचे दुःखं कमी झाल्याशिवाय राहणार नाही. हा स्त्री शोषणाचा प्रश्न समाजाच्या ऐरणीवर येणार नाही म्हणून अतिशय निर्लज्ज व निर्भीडपणे लेखकाने आपल्याच मायबहिणीचे लैंगिक शोषण कसे होत होते याची प्राजंळ मांडणी केली आहे. याची अनेक उदाहरणे देता येतील –

१. ''रूपवान जल्मणं हा दलित जातीत शापच हाय. चांगली बायकू दुसऱ्याची अन् वंगाळ आपली, ही म्हणच हाय. चांगल्या बाईवर गावचा डोळा असतुया. मसामायला तिच्या नवऱ्यानं सोडून दिलं. त्येला तिचं रूपच कारण व्हतं. हणमंतानंबी भोगून सोडून दिलं. माय मला भागाकारावानी घिऊन जगत हुती''(पृ.–५०)

२. ''ज्येंच्याकडं धर्मानं दिलेली वर्णश्रेष्ठतेची सत्ता हाय अन् बापकमयची जायजाद हाय, त्येंनी इथल्या दलित अब्रुला भोगलं हाय. गावोगावच्या जमीनदार पाटलांनी शेतमजूर दलितांच्या बाया आपल्या पदरी बाळगल्या. रांडंवानी वापरल्या. गरिबाची वयात आलेली पोर यांच्या वासनेची शिकार व्हायाची. पाटलानी भोगलेल्या स्वैराचाराची अशी एक संतती हाय. पाटलांची मर्जी सांभाळून जगणारी अशी काही घरं हायती. सगळा गाव या घरला 'पाटलाच्या रांडेचं घर' म्हणतोय. या बाईच्या पोटच्या पोरांना 'पाटलाच्या रांडेची पोरं' म्हणतात. पाटलाच्या दयेवर, येण्या–जाण्यावर खूश होऊन जगणं ह्येच्या शिवाय ह्या घराला काय मिळतं?''(पृ.–५०)

३. ''हणमंतानं मसामायीचं नांदणं तोल्डं. मसामायला नवऱ्यानं फारिकात दिली, अन् हणमंतानं मसामायला आपली 'रांड' म्हणून ठिवलं. गावचा पाटील, जमीनदार दलिताची बाई 'रांड' म्हणून ठिवतात. असं प्रत्येक गावकुसात येक असतं. या रांडपोटी जन्मलेल्या पोरांना हक्काचा बाप नसतो. पाटील, जमीनदारांना बाप म्हणायाची भीती असते, कारण या बाप–मुलांमध्ये अनेक जीवघेण्या दऱ्या असतात.''(पृ.–७०)

४. ''मसामायनं काकाला अन् हणमंताला घराबाहीर काल्ढं अन् दार लावून घितलं. मसामाय मला पोटात घिऊन निजली. तिचे हुंदके ज्वालामुखीच्या स्फोटागत वाटत व्हते. तिचे अश्रू नजिकच्या प्रलयाचे प्रेषित वाटत व्हते. थोड्या वेळानं काका व हणमंता परत आले. त्येनी दाराला धक्का दिला, पर मसामायनं दार उघडलं न्हाय. 'तुमी जाताव का आता जाळून घिऊ?'माय संतापानं थर्रारली व्हती. म्या गलबलून गेल्तो. काका मसामायला हणमंतासंग नीज म्हणत हुता.''(पृ.–७२)

५. ''भाकरबी त्येंच्याच हातात हुती अन् इथल्या अब्रुची निरीबी त्येंच्याच हाती हुती. एका हातानं भूक भागवली, तर दुसऱ्याहातानं भोग घितला.''(पृ.–७५)

६. ''देवकी सडी बाई. रामाप्पाच्या मळ्यात काम करणारी. देवकीचं लग्नं झालं न्हौतं. घरची गरिबी. देवकी पोट पाडायची. अडल्या–नडल्या बाया देवकीकडं येयाच्या. पोट पाडून घेयाच्या. अब्रु जीवापेक्षाही दांडगी असतीया.... देवकीलाबी पोट राहीलं. पहाटं लेकराला जन्म दिला. दिसं उजाडण्याच्या आत त्या लेकराला तिनं उकिरड्यात नेऊन पुरलं.''(पृ.–७७)

७. ''आमच्या सारख्या दलित तरूणानं गावातल्या बाईला नजरेनं बगितल्तं. निं घरात जाऊन सांगितलं. दलितानं सवर्ण स्त्रीकडं डोळा उचलून बघणं देखील गुन्हा! सगळा गाव येक व्हवून महारवाड्याला तानवू तानवू मारल्ता. पुढे महारवाड्यातल्या सगळ्या तरूण लोकांवर गावान कुरापत काढून खटलं केलं. सगळ्या महारांना वर्सावर्साची सजा झाली. सजा भोगून जवा जे घरला आले, तवा त्येंच्या बायका यकेक लेकरं हाळजल्त्या. गाव असला कडू असतूया.''(पृ.–८१)

अशा विविध उदाहरणांमधून शरणकुमार लिंबाळे यांनी 'अक्करमाशी' मधून सर्वहारा स्त्रियांचे शोषण, लैंगिक भोग येथील सवर्ण समाज कसा घेत होता. याचे स्पष्ट अन् परखड वास्तव मांडले आहे. सवर्णाच्या मुलीकडे, बाईकडे साध्या नजरेने पाहिले तर त्यांना मारहाण, सजा आणि तेच सवर्ण मात्र दलितांच्या स्त्रियांवर भोग घेऊन मातृत्त्व लादतात. ही किती अन् कोणत्या पातळीवरची शोषणाची रीत आहे? असा प्रश्न शरणकुमार लिंबाळे या आत्मकथनातून विचारतात.

शरणकुमार लिंबाळे यांनी 'अक्करमाशी' मधून येथील प्रस्थापित समाजव्यवस्थेला अनेक प्रश्न विचारले आहेत. ते त्याच्या जगण्याचे, अनुभवाचे आणि पर्यायाने सबंध दलित समाजाचे, सर्वहारा लोकांचे प्रश्न आहेत. संस्कृतीच्या रक्षणकर्त्यांना विचारलेले

हे प्रश्न आहेत. ''समाजाच्या जीवनातले सर्वात भीषण वास्तव म्हणजे अस्पृश्यता! भारतीय समाजव्यवस्थेने दलितांवर लादलेला हा कुष्ठरोगच आहे. रक्तपित्ती भरलेल्या माणसापेक्षाही अधिक वाईट स्थिती तिने एका समाजघटकावर शतकानुशतके लादली. तथापि त्या अवस्थेत देखील जगण्याची धडपड त्याला करणे भाग आहे. दलित आत्मकथा ही प्रामुख्याने दलित समाजावर शतकानुशतके लादलेल्या अमानुष शोषणाची दुःखकथा आहे. 'माझ्यावर व माझ्या समाजावर ही अमानुषता का लादली गेली?' हा सवाल दलित लेखकाने उपस्थित केला आहे. दलित आत्मकथा ही एका अर्थाने सबंध दलित समाजाची आत्मकथा ठरते. आणि दलित लेखक हा तिचा 'ॲन्टी–हिरो' (प्रतिनायक) असतो.'' या प्रतिनायकाने असे विविध प्रश्न येथील समाजव्यवस्थेला खुलेआम विचारले आहेत. दलित समाजातील माणसाला स्वतःचे 'माणूस' म्हणून असलेले अस्तित्त्व सिद्ध करण्यासाठी, प्रस्थापित बुरसटलेल्या व्यवस्थेविरूद्ध विविध पातळ्यांवर लढा द्यावा लागतो. हा विचारांचा लढा दलित लेखकांनी आपल्या साहित्यातून उभा केला आहे. शरणकुमार लिंबाळे यांनी अशा प्रकारचे विविध वैचारिक प्रश्न या आत्मकथनातून समाजव्यवस्थेला परखडपणे विचारले आहेत.

लेखकाने 'मी कोण?'हा प्रश्न  या आत्मकथनातून निर्माण केला आहे. कारण बाप लिंगायत, आई महार त्यामुळे मी लिंगायत की महार? मला दलित 'अक्करमाशी' म्हणून हिणवतात आणि लिंगायत मला स्वीकारत नाही. म्हणून मी कोण? हा प्रश्न लेखकाने समाजव्यवस्थेलाच विचारला आहे. ""Who am I ? हा नीग्रोसारखाच Identification चा प्रश्न मलाही सतत सतावणारा. 'मी सवर्ण की अस्पृश्य?, 'मी कोण?''(मनोगत/पृ.सहा) या वेदनेतूनच लेखक लिहितात, ''माझ्या शरीरात एका सवर्णाचं रक्त फिरत आहे, खालून वर. हे माझ्या शरीरातलं रक्त उपसून टाकता येईल का? मला माझ्या शरीराची घृणा वाटतेय. मी जगतोय ती वेदना माझी आहे, तितकीच ती या गावकुसाची आहे.'' ही वेदना ज्या समाजव्यवस्थेने दिली त्या व्यवस्थेला हा थेट प्रश्न लेखकाने विचारला आहे.  यासंदर्भात डॉ. गंगाधर पानतावणे लिहितात, ''स्त्री पुरूष संबंधातून व्यक्तीचा जन्म होतो. म्हणून येथे प्रश्न बाप असण्याचा किंवा नसण्याचा नाही, तर समाजव्यवस्थेने मान्यता दिलेल्या क्रूर संकेताचा आहे. म्हणूनच अत्यंत प्रक्षुब्ध झालेल्या शरणकुमारने जन्मशुद्धीलाच आव्हान दिले. 'प्रत्येकाला काय हमी देता येते, की आपुन आपल्या बापाचे हाय म्हनून? कोण

बगितलाय आपलीच बीजधारणा? कोण बगितलाय जन्मण्यापूर्वी आपल्या मायबापाचा संभोग?(पृ.७०) शाळेत नाव टाकतानाही बापाचा प्रश्न उद्‌भवला होता. हे सारे मोहोळ उठावे तसे होते. शरणकुमारच्या विदीर्ण झालेल्या मनाची अवस्था वाचकालाही अंतर्मूख केल्याशिवाय राहात नाही.'' असे अस्तित्वाचे, स्वाभिमान निर्माण करणारे, माणूस म्हणून जगता येण्याचे, शोषणाचे, अत्याचाराचे विविध प्रश्न लेखकाने या आत्मकथनातून जागोजाग उपस्थित करून समाजव्यवस्थेला अतिशय परखडपणे विचारले आहेत.

जात, धर्म, पंथ हे सर्व माणसाने आपल्या स्वार्थासाठी निर्माण केले आहेत. लोकं सोयीनुसार वागतात, जगतात. याची जाणीव शरणकुमार लिंबाळे यांना आहे. म्हणून ते यासंदर्भात काही प्रश्न सबंध व्यवस्थेलाच विचारतांना म्हणतात, ''माणूस धर्म अडवतो, का धर्म माणसाला? धर्माचा परीघ मोठा, की माणसाचा? माणूस धर्मासाठी की, धर्म माणसासाठी? माणूस धर्म नासतो, की धर्म माणूस? धर्म, जात टाकून माणूस जगू शकत न्हाय कां?' यासर्व प्रश्नांची उत्तरे लेखकाने समाजव्यवस्थेला मागितली आहेत. परंतु ही व्यवस्था आपल्या स्वार्थानुसार प्रश्नांची सोयीस्कर उत्तरं देतीलही, पण हे सारे प्रश्न माणूसपणाला आव्हान देणारे आहेत. त्याच्यातील माणुसकीला जागृत करणारे आहेत एवढे मात्र खरे!

स्पृश्यास्पृश्य भेद हा भारतीय समाजाला लागलेला कलंक आहे. माणसाने माणसाकडे माणसासारखे पहावेत. त्याच्याशी माणसाप्रमाणे वागावे एवढे साधे समतेचे तत्त्व सर्वत्र निर्माण झाले पाहिजे. परंतु येथील समाजव्यवस्था स्पृश्यास्पृश्यतेचा भेदभाव करून काहींना उच्च प्रतीचे जीवन आणि काहींना जन्माच्या आधारावर जनावरांपेक्षाही बत्तर दर्जाचे जगणे. ही कोणती समाजव्यवस्था आहे? स्पृश्यास्पृश्यता भेदाविषयीचे अनेक प्रश्न लेखकाने या आत्मकथनातून निर्माण केले आहेत. एका प्रसंगी लिंबाळे यासंदर्भात प्रश्न उपस्थित करतात की, ''आमी महार हाव? आमच्या स्पर्शामुळं पानी विटाळतंय, तर नदी का विटाळत न्हैय? आमच्या स्पर्शामुळं माणूस विटाळतो, तर का झाली न्हैस हिरवी–पिवळी तू? या पाटीतल्या भाकरी का सडल्या–कुजल्या न्हैत? आमाला महार म्हनतीच, तर सांग याचं उत्तर?'' शरणकुमार लिंबाळेंनी हा प्रश्न सबंध भारतीय समाजव्यवस्थेलाच विचारला आहे. लेखक या स्पृश्यास्पृश्य भेदाविरूद्ध एका प्रसंगी पेटून उठतो. अन् 'शिवराम' हॉटेलवाल्याविरूद्ध

स्पृश्यास्पृश्यता पाळतो म्हणून पोलीस ठाण्यात तक्रार करतो. दलितांनी स्वाभिमानाने उभे राहून ही स्पृश्य अस्पृश्यतेची भींत पाडली पाहिजे हा विचार या प्रसंगातून लेखकाने मांडला आहे. पण ही स्पृश्यास्पृश्यतेची भींत पाडणे एवढे सोपे नाही. भारतीय समाज अजूनही एवढा पुढारलेला नाही. ''माणूस जन्मतःच जात कसा घेऊन जन्मतो? जन्मतःच तो अस्पृश्य कसा असतो? जन्मतःच तो गुन्हेगार कसा असतो?'' असे अनेक प्रश्न लेखकाने या समाजव्यवस्थेला विचारले आहेत. जर समाजव्यवस्था या प्रश्नांचे उत्तर देत नसेल तर मी तरी ही नीतीमत्ता का पाळू? असे म्हणून लेखक उद्वेगाने लिहितात, ''हा व्यवस्थेचा चक्रव्यूह का रचला आहे? ही नीती-अनीती कोणी निर्माण केली? का केली? माझा जन्मच अनैतिक ठरवला जात असेल तर मी कुठल्या नीती पाळू?'' अशाप्रकारे येथील बुरसटलेल्या विचारांच्या समाजव्यवस्थेला विविध प्रश्न विचारून लेखकाने निरूत्तर केले आहे. म्हणून या आत्मकथनासंदर्भात बाबूराव कांबळे यांनी लिहिलं आहे, ''अक्करमाशीची निर्मिती म्हणजे इथल्या विकृत समाजव्यवस्थेचे, विकृत संस्कृतीचे शवविच्छेदन वाटते.''

डॉ. शरणकुमार लिंबाळे यांचे 'अक्करमाशी' हे आत्मकथन मराठी दलित आत्मकथनामध्ये वेगळा प्रवाह आहे. दलित समाजातील लेखकांची बरीच आत्मकथनं आलेली आहेत, खूप गाजलेली सुद्धा आहेत. या लेखकांनी आत्मकथनातून मांडलेला लढा हा दलितेतर समाजाशी होता, आहे. त्या-त्या लेखकांनी आपल्या दलित समाजाचे प्रवक्ते होऊन प्रस्थापित समाजाने केलेले विविध पातळींवरचे शोषण आपल्या साहित्यातून मांडले. परंतु शरणकुमार लिंबाळे यांनी प्रस्थापित समाजव्यवस्थेने केलेल्या शोषणाची मांडणी तर केलीच, त्याचबरोबर जन्माने 'अक्करमाशी' असल्यामुळे दलित समाजानेही कसा अपमान व अवहेलना केली याचीही परखड व निर्भीड मांडणी आपल्या आत्मकथनातून केली आहे. अशी मांडणी मराठी दलित आत्मकथनात अभावानेच झालेली दिसते. म्हणून मला 'अक्करमाशी' हे आत्मकथन दलित आत्मकथनातील वेगळा प्रवाह वाटतो. यासंदर्भात डॉ. जनार्दन वाघमारे अतिशय स्पष्टपणे लिहितात, ''अक्करमाशी' ही दलित आत्मकथा आहे. दलित आत्मकथा म्हणजे दलित आत्मव्यथा! तिला आत्मव्यथा म्हणणेच अधिक अर्थपूर्ण ठरेल. पण शरणकुमार यांची आत्मकथा ही इतर आत्मकथांपेक्षा काहीशी वेगळी आहे. दलितांना दलित म्हणून भोगाव्या लागणाऱ्या दुःखांचा समावेश तर तीत आहेच; पण त्याहीपेक्षा

अधिक वेदना देणारे दुःखं तीत आहे. आणि ते दुःखं आहे वस्तुतः अक्करमाशी असण्याचे. अक्करमाशी हा त्या–त्या समाजाचा अनौरस पुत्र असतो. आणि म्हणून तो–तो समाज त्याची सतत अवहेलना करतो. दलित आत्मकथेमध्ये दलित लेखक व त्याचा दलित समाज यांच्यात परस्पर द्वंद्व आढळत नाही. उलट, तो दलित समाजाचा प्रवक्ता असतो. त्यांचा संघर्ष असतो तो दलितेतरांशी. दलित समाजाशी त्याचे नाते जिव्हाळ्याचे असते यात शंका नाही. आपुलकीच्या नात्याने तो आपल्या समाजाकडे पाहतो. त्याचा समाजही त्याच्याकडे तितक्याच आपुलकीने पाहतो. स्वतःच्या समाजात त्याला पॉझिटिव्ह आयडेंटिटी सापडते. शरणकुमार लिंबाळे यांच्या बाबतीत मात्र वरील विधाने करता येत नाहीत. त्यांची आत्मप्रतिमा (Self image) दलित समाजाच्या संदर्भातही तडकलेली आहे.''

डॉ. शरणकुमार लिंबाळे यांनी अतिशय परखड, निर्लज्ज शब्दात आत्मकथन लिहितांना आपल्या भवितव्याचा , या सर्व लिखाणाचा आपल्या भविष्यावर काय परिणाम होईल याचा कुठलाही विचार न करता जे वास्तव आहे, जे सत्य आहे ते अतिशय प्रखर आणि परखड शब्दात मांडले आहे. लेखकाने आपले स्वतःचे, कुटुंबाचे व समाजाचे जगणे कुठलाही आडपडदा न ठेवता या आत्मकथनातून जगासमोर मांडले आहे. या आत्मकथनातून त्यांनी आपले आयुष्य जनावर सोलावं तसं स्वतःलाच विविध दुःखदायी प्रसंगाद्वारे सोलून दाखविले आहे. हे सोलणे जितके दुःखदायी, वेदनादायी आहे. तितकेच मानवी सभ्यतेचा नकली बुरखा फाडणारेही आहे. येथील प्रस्थापित समाजव्यवस्थेला आणि आपल्या दलित समाजालाही त्याच्या वागण्याचा जाब विचारणारे हे आत्मकथन आहे. अतिशय ठामपणे आणि निर्भीडवृत्तीने लेखकाने विविध प्रसंगातून आपले दुभंगलेपण या आत्मकथनातून चित्रित केले आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारप्रेरणेने सर्वहारा दलित समाजाला स्वभान, आत्मसन्मान प्राप्त झाला आहे. असे असले तरी, 'अस्पृश्यातील अस्पृश्य', 'दलितातील दलित' ही जाणीव अजूनही संपलेली नाही. याची साक्ष हे आत्मकथन पटवून देते. स्वतःविषयीचे प्रखर सत्य निर्लज्जपणे लेखकाने या आत्मकथनातून मांडले आहे. हे उघडं नागडं जीवन मांडल्यानंतर त्याचा आपल्या भावी जीवनावर काय परिणाम होईल, याची कोणतीही भिती त्यांनी बाळगली नाही. 'जे जगण्यात आहे ते शब्दात मांडलं' म्हणून हे आत्मकथन वाचक मनाचा ठाव घेणारे अन् अनेक प्रश्नांनी वाचकमन

सुन्नं करणारे झाले आहे. त्यामुळेच ते मराठी शिवाय आणखी ११ भाषांमध्ये भाषांतरीत झाले आहे. साहित्यरत्न अण्णा भाऊ साठे यांचे साहित्य जगातील २७ भाषांमध्ये भाषांतरित झाले आहे. अण्णा भाऊ साठे यांच्या साहित्यानंतर एवढ्या मोठ्या प्रमाणात एकूण ११ भाषेत भाषांतरित झालेले हे कदाचित मराठी साहित्यातील एकमेवाद्वितीय आत्मकथन असेल. यातच शरणकुमार लिंबाळे यांच्या 'अक्करमाशी' या आत्मकथनाचा प्रांजळपणा व यथार्थता दडलेली आहे.

संदर्भ :


१. लिंबाळे, शरणकुमार – अक्करमाशी, दिलीपराज प्रकाशन, पुणे.

२. नेमाडे, भालचंद्र – टीका स्वयंवर, स्वरुप प्रकाशन, औरंगाबाद

३. कामत, सतीश – (आंतर जलावरील लेख) दि. १५/०२/२०२०

४. खंदारे, विजयकुमार – अक्करमाशी : ठसठसणाऱ्या वेदनांचे गॅझेट (संपा.) दिलीपराव प्रकाशन, पुणे.




ISSN 2249-0817 WARUL

# शरणकुमार लिंबाळे यांच्या कथांमधील दाहक जीवनानुभव

**धनपाल कांबळे, दापोली**

मराठी दलित साहित्यात कथा, कादंबरी, कविता, आत्मकथन, समीक्षा, वैचारिक, संपादने अशा विविध साहित्यप्रकारात ज्यांनी आपला वेगळा ठसा उमटविला आहे. असे नामवंत लेखक म्हणजे शरणकुमार लिंबाळे होत. शरणकुमार लिंबाळे हे वैविध्यपूर्ण लेखन करणारे लेखक आहेत. दुसऱ्या पिढीतील कथालेखन करणारे कथाकार म्हणून ते परिचित आहेत. त्यांनी 'हरिजन' (१९८८), 'रथयात्रा' (१९९३) व 'दलित ब्राह्मण' (२००४) इत्यादी कथासंग्रहांची निर्मिती केली आहे. आपल्या कथालेखनातून प्रामुख्याने दीन–दलित, गरीब आणि वंचित समाजाचे जीवन रेखाटले आहे. दलित समाजाचे दुःख, दारिद्र्य, चीड, आक्रोश, वेदना, संघर्ष याचे प्रभावीपणे त्यांनी चित्रण केले आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचार व तत्त्वज्ञानाने प्रभावित झालेले शरणकुमार लिंबाळे यांचे तात्त्विक अधिष्ठान पक्के झाले होते. म्हणून त्यांनी आपल्या साहित्याच्या माध्यमातून दलित समाजाला जागृत व आत्मभान प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या कथांतून आपल्यावर होणाऱ्या अन्याय, अत्याचार याच्या विरूध्द बंड करताना अनेक व्यक्तिरेखा पहायला मिळतात. व्यक्तिरेखा चाकोरीबद्ध जीवन जगणाऱ्या नाहीत. वेळ पडल्यास दोन हात करणाऱ्या आहेत. सहनशीलतेची परिसीमा संपली की व्यक्ती कोणत्या थराला जाऊ शकते याचे चित्रण आपल्याला लिंबाळे यांच्या कथांतून पहायला मिळते. राजकारणामध्ये दलित समाजाचा कसा वापर करून घेतला जातो आणि वेळप्रसंगी त्याला कसे फेकून दिले जाते. असहाय, हतबल व्यक्ती नाहीत असे नाही. परंतु अखेरीस नाईलाज म्हणावे लागेल. बऱ्याच वेळा पर्याय नसतो. निर्णय घेणे कठीण जाते. असे देखील प्रसंग समाजामध्ये निर्माण होतात. याची प्रचिती आपल्याला त्यांच्या अनेक कथांमधून येते. होणाऱ्या अन्यायाची जाणीव करून देण्यामध्ये लेखक सफल होतात. भारतामध्ये किंबहुना महाराष्ट्रातील विविध समाजात आतापर्यंत हक्क, अधिकार व समानतेच्या संधीपासून जो समाज

वंचित राहिला. त्या समाजावर त्यांनी लक्ष केंद्रित केले. दलित कथाकार, दलित कथेची प्रेरणा, दलित कथेतील अनुभवविश्व इत्यादींच्या पार्श्वभूमीवर लिंबाळे यांच्या 'हरिजन', 'रथयात्रा', व 'दलित ब्राह्मण', या कथासंग्रहांनी मराठी कथावाङ्मयात मोलाची भर टाकली आहे. भारतीय समाजव्यवस्थेमध्ये दलित समाज हा कशाप्रकारे गेल्या अनेक शतकांपासून जातीभेदामुळे नागवला गेला आहे. याचे प्रखर चित्रण लिंबाळे यांच्या कथालेखनामधून झालेले दिसते.

शरणकुमार लिंबाळे यांच्या कथांमध्ये माणुसकीचा झरा आहे. होकार, नकार स्वीकारत जीवन जगणारी माणसे अवश्य भेटतील. परंतु त्यांना परिस्थितीने हतबल केले आहे. हेही लक्षात घेतले पाहिजे. त्यांच्यात आत्मतेज, स्वजाणीव निर्माण करण्याचे कार्य लेखकांनी केले आहे. भौतिक परिस्थिती, विचार करण्याची पद्धत, राहणीमान, समजूतदारपणा, मानसिकता यात झालेले स्थित्यंतर आपल्याला त्यांच्या कथांमध्ये पहायला मिळते. दलित समाजात हळूहळू बदल होत चाललेला आहे. आर्थिक सुधारणा, शिक्षण, उद्योग, नोकरी यातील त्यांची प्रगती या सा–या गोष्टी हळूहळू आपल्या लक्षात येतात. जातीयतेचे, दाहक जीवनानुभवाचे दर्शन घडविण्याच्या तसेच ते दुःख चव्हाट्यावर मांडण्याच्या उद्देशातूनच दलित साहित्याची निर्मिती झालेली आहे. शरणकुमार लिंबाळे यांचा 'हरिजन' हा कथासंग्रह त्याच्या शीर्षकातूनच जातीयतेच्या, अस्पृश्यतेच्या जाणिवेचा निर्देश होतो. एकीकडे अस्पृश्यांना 'हरिजन' म्हणजे देवाची लेकरे असे संबोधायचे आणि दुसऱ्या बाजूला याच देवाच्या लेकरांना अतिशय हीनत्वाची वागणूक द्यायची. त्यांना पायदळी तुडविले जायचे अशी दुटप्पी भूमिका सवर्णांची आहे. त्यांची ही मानसिकता अनेक कथांमध्ये पहायला मिळते. याचा निर्देश 'हरिजन' या कथासंग्रहामध्ये केला गेला आहे. 'हरिजन' या शब्दातून अस्पृश्यतेचाच निदर्शक असल्याचे दिसते. त्यामुळे या कथासंग्रहातील बहुतांश कथा या अस्पृश्यतेचे दर्शन घडवितात. कथेतून जातीयतेचे, अस्पृश्यतेचे विदारक आणि भयावह चित्रण झालेले दिसते.

दलित जीवनावर आघात करून रक्तबंबाळ करणारी जाणीव म्हणजे अस्पृश्यता. ही अस्पृश्यता म्हणजे भारतीय समाजावरील कलंक असल्याचे अनेकांनी म्हटले आहे. शरणकुमार लिंबाळे यांनी ही अस्पृश्यतेची, जातीयतेची वेदना आपल्या कथांमधून मांडण्याचा प्रयत्न केला आहे. अस्पृश्यतेचे अत्यंत वस्तुनिष्ठपणे चित्रण करणारी

'हरिजन' ही कथा आहे. ब्राह्मण, स्पृश्य, सवर्ण अशा कुलकर्णी गुरूजींना गावात प्रतिष्ठा आहे. पाटलाच्या घरी मानपान आहे, त्यांच्याकडे आदराने पाहिले जाते. गावात भांडणे पेटविणाऱ्या कुलकर्णी गुरूजींची प्रवृत्ती ही कितीही मारक, बाधक असली तरी, त्यांच्या सवर्णपणाखाली ती झाकून जाते. परंतु कुलकर्णी गुरूजींच्या ठिकाणी बदली होऊन आलेल्या हरिजन मास्तरांना मात्र, गावात कुत्र्या-मांजराइतकीही प्रतिष्ठा मिळत नाही. त्यांना अतिशय हीनत्वाची वागणूक दिली जाते. गावातील सवर्ण समाज त्यांच्याकडे तुच्छतेने पाहतो. आपल्या मुलांना विटाळ होईल म्हणून ते हरिजन मास्तरांच्याकडे शिकायला पाठवत नाहीत. गावातील लोकांची अस्पृश्यांविषयक मानसिकता प्रकट करताना लिंबाळे म्हणतात, 'मास्तर असला म्हणून काय झालं. शेवटी तो हरिजनच की' या विधानातून हरिजनांविषयी गावातील सवर्णांची मानसिकता या कथेत दिसून येते.

'हरिजन' या कथासंग्रहातील आलेले विषय दलित जाणिवांना अत्यंत जवळचे असून या कथांविषयी डॉ.गंगाधर पानतावणे म्हणतात, 'दलितांच्या समस्यांची मांडणी आणि उकल करताना लेखकाला दलित मनात प्रवेश करायचा असतो. अस्पृश्य जगणं जिकीरीचे असते. सावलीसारखी त्याची जात त्याच्या सोबत असते. लिंबाळे यांनी असे अस्पृश्यांच्या जीवनातील नेहमीचेच प्रश्न कथाविषय केलेले आहेत.' डॉ. गंगाधर पानतावणे यांनी दलित जीवनातील प्रश्न शरणकुमार लिंबाळे यांच्या कथेचे विषय आहेत असे जे म्हटले आहे, त्याचा प्रत्यय 'हरिजन' या कथासंग्रहातून येतो.

'हरिजन' मधील कथा दलित समाजातील वास्तव जीवनाचे चित्रण करणाऱ्या तर आहेतच, पण त्याचबरोबर त्या वास्तवतेतून सामाजिक भान देण्याचा प्रयत्न करणाऱ्यादेखील आहेत. लिंबाळे यांची अस्पृश्यतेची वेदना त्यांच्या कथांमधून प्रभावीपणे अविष्कृत होत जाते. मराठी पारंपरिक कथेमधून दलितांबद्दल असलेली त्यांची दया, सहानुभूती व्यक्त होताना दिसते. दलितांच्या जीवनातील वेदना मात्र तितक्या तीव्रतेने व्यक्त होत नाही. पण शरणकुमार लिंबाळे यांच्या सर्व कथासंग्रहातून वेदना, विद्रोह आणि त्यातून उठणारा जातीय संघर्ष यांचे प्रकर्षाने प्रकटीकरण होते. अस्पृश्यांना माणूस म्हणून जगणेच नाकारणाऱ्या प्रवृतीचा निषेध त्यांच्या कथांमधून प्रभावीपणे व्यक्त होताना दिसतो. अवतीभोवती चाललेल्या सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक मंथनाचे नेमकेपणाने ते वेध घेतात. आपल्या कथांच्या माध्यमातून सवर्णांचे खरे रूप

समाजापुढे ठेवतात.

ग्रामीण भागातील उच्चवर्णीयांना निरक्षर राहणे परवडते, पण हरिजन मास्तराच्या हाताखाली शिकायला ते कधीही तयार होणार नाहीत. त्यांना ते अमान्य आहे. 'दलित ब्राह्मण' या नावाला साजेल अशा ही बऱ्याच कथा आहेत. परंतु स्थित्यंतर, श्रध्दांतर हे आवश्यकच आहे. आणि हीच कल्पना आपल्याला 'दलित ब्राह्मण' या कथासंग्रहमध्ये पहायला मिळते. शिकले किवा नोकरीस लागले. आर्थिक सुबत्ता आली, मान–सन्मान होऊ लागला, म्हणजे याचा अर्थ सवर्णांची मानसिकता बदलली असे समजण्याचे कारण नाही. काही आपली जात लपवून जगू लागले, काहीजण पांढरपेशा होऊ लागले हे असे दलित निर्माण होऊ लागले.

दलित लेखकाने त्याला आलेले दाहक अनुभव शब्दबद्ध करताना जी साहित्यनिर्मिती केली त्याला जगाच्या वाङ्मयीन इतिहासामध्ये तोड नाही. हे साहित्य अस्सल जीवनानुभवातून निर्माण झालेले असून समाजातील तळागाळातील दुर्लक्षित झालेल्या अस्पृश्य समाजाच्या मनाचा हंकार आहे. या अनुभवात एक दाहक भीषण वास्तवता असून दलित लेखक हे प्रत्यक्ष त्या वास्तवाचे साक्षीदार आहेत. दलित साहित्यातून व्यक्त होणारे दलित जीवन हे सामाजिक विषमता, अन्याय, जुलूम यांचे दर्शन घडविते. पारंपरिक मराठी साहित्यापेक्षा दलित साहित्य हे अतिशय भिन्न आहे. या साहित्याचे सौंदर्यशास्त्र हे प्रस्थापित मराठी साहित्याच्या सौंदर्यशास्त्रापेक्षा वेगळे आहे. दलित साहित्याची समीक्षा करत असताना रूढ समीक्षेच्या निकषांना शरणकुमार लिंबाळे यांनी विरोध करून वेगळ्या सौंदर्यशास्त्राची मागणी केली आहे. शंकरराव खरात प्रस्थापित मराठी साहित्याबद्दल मत व्यक्त करताना म्हणतात, 'पांढरपेशी मध्यमवर्गीय लेखकांने लिहिलेल्या दलित कथेत, कादंबरीत दलितांबद्दल असलेली दया, सहानुभूती व्यक्त होते. पण दलितांच्या जीवनातील बोध आणि ठणकणारी वेदना त्यात व्यक्त होत नाही. त्यामुळे त्यांची कथा–कादंबरी अस्सल जीवन, जीवनानुभव घेऊन न आल्याने ती उत्कट व अस्वस्थ करणारी होत नाही. त्यातून प्रस्थापित मूल्ये व परंपरेविरूद्ध उठणारा संतापाचा डोंब याचा आविष्कार होत नाही. दलित साहित्यिकांचा जीवनानुभव हा त्यांच्या स्वतःच्या जगण्यातून, त्यातील संघर्षातून आलेला असल्यामुळे त्यांच्या कथामधून अस्सल जीवन व्यक्त होते. या दृष्टीने विचार केल्यानंतर असे दिसते की, शरणकुमार लिंबाळे यांच्या 'रथयात्रा' या कथासंग्रहातून दाहकता दिसून येते.

गाजावाजा करून भारतीय स्वातंत्र्याचा सुवर्ण महोत्सव साजरा आपण केला. मात्र स्वातंत्र्य प्राप्तीनंतरही आपल्या पदरी निराशाच पडली. म्हणून विद्रोही कवी नामदेव ढसाळ 'स्वातंत्र्य कंच्या गाढवीचं नाव आहे' असे उपहासाने म्हणतात. 'रथयात्रा' या कथेच्या संदर्भात विचार केल्यानंतर अस्पृश्यांच्या जीवनातील स्वातंत्र्य प्राप्तीनंतरही असलेला अंधार ही कथा दाखविते. हिंदूराष्ट्राची संकल्पना बाळगणारा हिंदू धर्म एकीकडे, हिंदू–हिंदू–बंधू–बंधू असे म्हणतो. तर दुसरीकडे एका समाजाला अस्पृश्य ठरवून गावकुसाबाहेर ठेवतो. त्यांची वस्ती वेगळी, पाणवठे वेगळे, स्मशानभूमी वेगळी, मंदिरात प्रवेश नाही. अशा प्रकारच्या सामाजिक विषमतेचा आलेख ही कथा मांडते. भाजपच्या रथयात्रेत कारसेवक म्हणून सेवा करत असलेला दलित नायक पोलिसांच्या बरोबर झालेल्या दंगलीत गोळीबारात अपंग होतो. भीक मागून दिवस काढण्याची वेळ त्याच्यावर येते. राममंदिरासाठी धडपडणाऱ्या नायकास मंदिराचा पुजारी त्याचा अपमान करून त्याला मंदिरात प्रवेश नाकारतो. इतर भिका–यांना त्याच्याविरूद्ध पुजारी भडकावितो. भिकारी ! म्हणे कारसेवक असे म्हणून हिणवतो व मंदिराबाहेर धक्के मारून हाकलून देतो. एकूणच हिंदूंची मानसिकता, त्यांचा बेगडी पुरोगामीपणा यांचे दर्शनही ही कथा घडविते.

महार माणसे केवळ सेक्ससाठी सशक्त असतात. या भावनेने निलू युवकाबरोबर प्रेमसंबंध ठेवते. या दाहकतेचे चित्रण 'हलक्या जातीचा' या कथेत येते. सवर्ण प्रेयसीच्या सहवासात दलित नायक एकरूप होऊन जातो. सवर्ण मुलीबरोबरचे प्रेम त्याला क्रांतिकारी वाटते. प्रेमामुळे जातीयता नष्ट होईल असा विश्वास त्यांच्यामध्ये येतो. निलूचे प्रेम म्हणजे वर्षानुवर्षाची अस्पृश्यता दलित नायकावरील प्रेमाने दूर केली. दोघांच्या प्रेमाची जाहीर चर्चा व्हावी असे नायकाला वाटते. निलूचे प्रेम म्हणजे त्याला अद्भूत घटना वाटते. निलूचे प्रेम म्हणजे त्याला स्वप्न वाटते. म्हणून नायक म्हणते, 'निलू ....माझ्या मांडीवर पहुडलेली असते. एक सौंदर्य माझ्या सहवासात फुलत असतं... माझ्यासारख्या दरिद्री माणसाला इतकी सुंदर मुलगी बिलगते हा चमत्कार वाटत असतो. अशा या प्रेमामध्ये जातीयता नष्ट होण्याची भाबडी स्वप्ने पाहणाऱ्या नायकाला प्रेयसी निलू अपेक्षाभंगाचा धक्का देते. त्याचा संपूर्ण उपभोग घेतल्यानंतर जेव्हा त्यांचे लफडे पाटलास समजते. तेव्हा निलू आपली भूमिका बदलते व नायकास, त्याच्या प्रेमास नकार देते. 'हलक्या जातीचा' या कथेतून निलू नायकाचा

राणीमाशीसारखा उपभोग घेऊन नायकाच्या भावभावनांचा चक्काचूर करते. अशाच आशयाच्या 'सॉरी ! गुडनाईट !!' व 'निळे झेंडे' या कथा आहेत. लिंबाळे यांचे कथाविश्व खूप व्यापक आहे. गेली अनेक शतके माणूसच माणसाचा कसा द्वेष करतो आहे. तेही जातीच्या आधारे, जातीचे चटके किती भयानक असतात हे फक्त भारतात पहायला मिळते. लिंबाळे यांच्या कथांत चीड, विद्रोह यांचा पुरेपूर वापर करण्यात आला आहे. जातीयतेच्या रोगाने मानवी जीवन असह्य करून टाकले आहे. जातीवरून माणसे ओळखण्याची मानसिकता जोपर्यंत बदलत नाही. तोपर्यंत सवर्ण–दलित हा संघर्ष अखंडित चालू राहणार हे तितकेच खरे. ज्या देशांनी कर्तृत्वाला महत्त्व दिले ते देश महान झाले. शरणकुमार लिंबाळे यांनी खेड्यापाड्यातील जीवन जवळून पाहिले, अनुभवले, सोसले त्यात फारसा बदल झाला आहे, असे वाटत नाही.

'रथयात्रा'तील अनेक प्रश्नांनी नायक अस्वस्थ होतो, आणि या प्रश्नांतूनच व्यवस्थेची चिरफाड करतो. दलित कथेने हे कार्य जाणीवपूर्वक केलेले आहे. दांभिकतेचा बुरखा फाडणारी दलित कथा, तिच्या अंगभूत वैशिष्ट्यांबद्दल चंद्रकुमार नलगे व गंगाधर पानतावणे म्हणतात, 'एकीकडे नकार आणि दुसरीकडे स्वीकार यातील द्वंद्व दलित कथा अचूकपणे टिपते. कधी सामाजिक व सांस्कृतिक दंभाचा स्फोट करते, तर कधी ती अंतर्गत ताणतणावांना सामोरी जाते. लिंबाळे यांची 'रथयात्रा' ही कथा हे कार्य प्रभावीपणे, अचूकपणे करते. अभावग्रस्त माणसे बऱ्याचवेळी कसे सवर्णांच्या आहारी जाऊन बळी पडतात किंवा समाजांतर्गत, व्यक्तीअंतर्गत अडचणी निर्माण करणे, अडवणूक करणे, एकमेकांचे पाय खेचणे, अमिष दाखवून एखादे कृत्य करवून घेणे हे सर्व घडत असते. ते सवर्णांच्या सांगण्यावरून ! अनेक भानगडी, लफडी, हेवेदावे व गावपातळीवरील राजकारण अशा अनेक गोष्टी त्यांच्या कथांमधून त्यांनी अतिशय चपखळपणे मांडणी केल्याचे दिसते.

शरणकुमार लिंबाळे यांनी 'दलित ब्राह्मण' या कथासंग्रहाची निर्मिती २००४ साली केली. आतापर्यंत त्यांनी जेवढ्या कथा लिहिल्या, त्यातील निवडक कथांचा हा कथासंग्रह आहे. हा लघुकथासदृश कथासंग्रह असून यामध्ये एकूण एकतीस कथा आहेत. वास्तविक ब्राह्मणी जीवनशैलीचे अनुकरण करणाऱ्या दलितास 'दलित ब्राह्मण' म्हटले जाते. पण त्या अर्थाने तशा आशयाच्या या कथासंग्रहातील कथा नाहीत. भारतीय विषमतावादी समाजव्यवस्थेने समाजातील एका विशिष्ट वर्गाला अस्पृश्य

समजून त्यांची पशुपेक्षाही हीन अवस्था केली आहे. हीनत्वाच्या केंद्रस्थानी असलेला माणूस त्याला माणूस म्हणून निखळपणे जगता आले पाहिजे, ती त्याच्यात क्षमता आहे, पण या क्षमतेला संधी उपलब्ध होणार नाही. यासाठी प्रयत्नशील असलेला सवर्ण वर्ग आणि त्यातूनही दलित समाज मनात आणला तर तो काहीही करू शकतो, याची प्रचिती या विविध कथांच्या माध्यमातून शरणकुमार लिंबाळे यांनी दिली आहे.

दलित जीवनातील समस्यांची मांडणी व उकल करण्याच्या निमित्ताने लिंबाळे यांनी 'दलित ब्राह्मण' कथासंग्रहाची निर्मिती केल्याचे दिसून येते. दलितांच्या समस्या ह्या भयावह आहेत. गावकुसाबाहेरील उपेक्षित जीवन जगताना आलेले अनुभव मांडण्याबरोबरच दलित कथा वर्तमानकालीन दलित समाजातील समाजाचा शोध घेताना दिसते. म्हणून दलित कथेच्या व्यामिश्र जीवनदर्शनाबाबत डॉ. प्रकाश कुंभार म्हणतात, 'दलितांच्या वर्तमानकालीन सामाजिक जीवनाचा वेध, ग्रामीण जीवन, शहरी व झोपडपट्टी जीवनाचे चित्रण, दलित सुशिक्षितांच्या मनोवृत्तीचे चित्रण, दलित वस्त्यांचे चित्रण, दलित बालमनाचे चित्रण, दलित संसाराचे चित्रण इ. अनुभवविश्व समकालीन दलित कथेत आलेले दिसते.' डॉ. प्रकाश कुंभार यांनी दलित जीवनातील जे विषय मांडले आहेत. जे ताणतणाव मांडले आहेत ते सर्व ताणतणाव, अनुभवक्षेत्र शरणकुमार लिंबाळे यांच्या 'हरिजन' कथासंग्रहात आलेले दिसतात. 'दलित ब्राह्मण' या कथासंग्रहातील आलेले विषय दलित जाणिवांना अत्यंत जवळचे आहेत.

शरणकुमार लिंबाळे यांचे 'हरिजन', 'रथयात्रा' आणि 'दलित ब्राह्मण' हे कथासंग्रह पारंपरिक मराठी कथासंग्रहापेक्षा वेगळ्या स्वरूपाचे आहेत. मराठीतील पुष्कळशी कथा ही परंपरानिष्ठ आणि मध्यमवर्गीय जीवनाची आहे. या प्रस्थापित कथेचे अंतरंग परंपराधिष्ठित मूल्यांवर अधिष्ठित असणारे व त्या मूल्यांशी तडजोड करणारे असे आहे. लिंबाळे यांची कथा ही पारंपरिक कथेपेक्षा वेगळ्या धाटणीची असून ती नवपरंपरेला रूजविणारी आहे. दलित, पददलित, शोषित, पीडित समाजाच्या गांजलेल्या जीवनाची ती कथा आहे. त्यांच्या कथेचे भावविश्व हे प्रामुख्याने जन्म दलितांचे भावविश्व आहे. दलित-वंचितांच्या वेदनेला त्यांची कथा भिडते, व दलित-वंचितांच्या जीवनाचा ती प्रभावीपणे आविष्कार करते.



ISSN 2249-0817 WARUL

# ‘ओ...’

**विजयकुमार खंदारे, पुणे**

डॉ. शरणकुमार लिंबाळे यांची ‘ओ’ ही कादंबरी ऑगस्ट २०१५ मध्ये प्रकाशित झाली. लिंबाळे यांच्या इतर कादंबऱ्यांपेक्षा ही कादंबरी वेगळ्या धाटणीची आहे. या कादंबरी लेखनासाठी त्यांनी पाप्युलर वाङ्मयाचा फॉर्म वापरला आहे. लोकप्रिय वाङ्मयात ज्याप्रमाणे सेक्स, खून आणि रहस्य असते तसले रसायन या कादंबरीमध्ये मुबलक प्रमाणात वापरलेले आहे. ‘ओ’ ही कादंबरी हिंसा आणि रहस्य यांच्या आधाराने दलित आशय, विषय व्यक्त करताना दिसते. त्यामुळे या कादंबरीची दखल घेणे गरजेचे आहे.

‘ओ’ या कादंबरीचे वैशिष्ट्ये इतर दलित कादंबऱ्यापेक्षा वेगळे आहे. ही कादंबरी दलितांवर लिहिलेली असली तरी ती दलित वस्तींमध्ये घडताना दिसत नाही. त्यातली पात्रे ही सवर्ण आहेत. सवर्ण पात्रांच्या आधारे या कादंबरीच्या कथानकाचा विस्तार केलेला आहे; आणि निवेदनही सवर्ण पात्रांच्या तोंडूनच प्रकट होते. त्यामुळे दलितांविषयी सवर्णांची जी मानसिकता आहे, ती या कादंबरीच्या निवेदनातून वाचायला मिळते. ही या कादंबरीची विशेषतः आहे. दलित विषय सवर्णांच्या भाषेत मांडण्याचा प्रयत्न लेखकाने केलेला दिसतो. आजवरच्या दलित कादंबऱ्या या दलित वस्तीमध्ये घडलेल्या दिसतील. दलित पात्रे, दलित भाषा आणि दलित आशय–विषय हा या कादंबऱ्यांचा बाज असतो, पण लिंबाळेंनी दलित कादंबरीचा चेहरा मोहरा बदलण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

शरणकुमार लिंबाळे यांची ‘ओ’ ही कादंबरी त्यांच्या ‘हिंदू’ या कादंबरीशी थोड्याफार फरकाने साधर्म्य असलेली आहे. ‘हिंदू’मध्ये दलित शाहीर तात्या कांबळे यांचा खून होतो आणि त्या खूनाभोवती या कादंबरीचे कथानक फिरत राहते. अगदी तसेच ‘ओ’ कादंबरीमध्येही किरण कांबळे या दलित मुलीवर बलात्कार होतो आणि गुन्हा उघडकीस येऊ नये, म्हणून तिचा खून केला जातो. या प्रकरणाभोवती ‘ओ’ कादंबरीचे कथानक अतिशय कौशल्याने गुंफलेले आहे. लिंबाळेंच्या अनेक कादंबऱ्यांमध्ये हिंसेचा वापर केलेला दिसून येतो. ‘झुंड’मध्ये आनंद काशीकर याला फाशी दिलेली

दाखवली आहे. 'रामराज्य'मध्ये हमीद या मोहरमचा वाघ बनलेल्या तरूणाचा जमावाने केलेला खून दाखवलेला आहे, तर 'सनातन'मध्ये कार्टर पीटर महार याचाही खून झाल्याचे दाखवलेला आहे. लिंबाळे खुणशी मानसिकतेने लेखन करताना अनेकवेळा जाणवतात. त्यांच्या लेखनात सेक्स या भावनेचा मुक्तपणे वापर असलेला दिसून येतो. 'ओ' या कादंबरीमध्येही सेक्स आणि खून याचा उपयोग केलेला आहे. एखाद्या हिंदी सिनेमासारखी ही कादंबरी वाचकांच्या मनपटलावरून सरकत जाताना जाणवते. हे या कादंबरीचे वेगळेपण होय.

लिंबाळे यांच्या 'ओ' या कादंबरीचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्ये म्हणजे नायिकांच्या आधारे या कादंबरीचे कथानक विकसित केलेले दिसते. या कादंबरीमध्ये एकूण चार नायिका आहेत. त्यातली पहिली किरण कांबळे ही नायिका दलित तरूणी आहे. गावातल्या चांडाळचौकडीने (गुरूनाथ वाकडे, श्रीरंग, धर्म्या आणि बापू देसाई) या दलित तरूणीवर कादंबरीच्या सुरूवातीलाच बलात्कार करताना दाखवलेले आहे. बलात्काराच्या सीननेच या कादंबरीची सुरूवात होते. हे धक्कातंत्र लेखकाने वापरलेले आहे. कादंबरी वाचताना भय वाटावे. इतके रानटी क्रौर्य या कादंबरीमध्ये वाचायला मिळते. किरण कांबळेचा खून होतो. हा खून कुणी केला याचा शोध घेत असताना पुन्हा एकामागून एक दोन स्त्रियांचे खून होतात. हे खूनाचे सत्र हिंदी रहस्य चित्रपटाला शोभेल असे असले, तरी दलितांच्या जीवनावरील अत्यंत मर्मभेदी अशी ही कादंबरी आहे.

या कादंबरीमध्ये दुसरी नायिका ही सवर्ण तरूणी आहे. या तरूणीच्या निमित्ताने लिहिलेला प्रसंग देखील महत्त्वाचा आहे. दोन सवर्ण तरूण (रघू आणि रव्या) आणि एक दलित तरूण (गण्या) गावातल्या सारंगी या सवर्ण तरूणीला गावाबाहेरच्या किनगाव रोडकडे दुचाकीवरून घेऊन जातात. ती रात्रीची वेळ आहे. गावाबाहेर दोघे सवर्ण तरूण तरूणीबरोबर शरीर सुख उपभोगतात, याचे चित्रण लिंबाळेंनी खुबीने केलेले आहे. हा तर त्यांच्या लेखनाचा आवडता विषय आहे. सेक्सविषयी लिहिताना लिंबाळेंची लेखणी अधिक तरल, उत्कट आणि वाचनीय होते. लेखकाने सेक्समध्येही जातीयता कशी असते, याचे भेदक वर्णन या प्रसंगातून रेखाटले आहे. सारंगी ही सवर्ण तरूणी रघू व रव्या या सवर्ण तरूणांबरोबर शरीरसुख उपभोगल्यानंतर उठून उभी राहते. तेव्हा गण्या या दलित तरूणांने तिचा हात धरल्यानंतर ती झिडकारते आणि

शरीरसुख द्यायला नकार देते. ''हात सोड. मी नाही झोपणार महाराबरोबर!'' (पृ. १३४) असे म्हणून गण्याला दूर ढकलून देऊन निघून जाते. ही 'ओ' कादंबरीमधली दुसरी नायिका आहे. सवर्ण स्त्रीच्या मनातील दलित तरूणांविषयी असलेली तिटकाराची भावना येथे व्यक्त झाल्याचे दिसून येते. तर दुसरीकडे सवर्ण तरूण गुरूनाथ देवयानीच्या संदर्भात म्हणतो, ''महारानं विटाळलेल्या बाईबरोबर मी झोपणार नाही.'' (पृ. ११०)

लिंबाळे यांच्या 'ओ' कादंबरीतली तिसरी नायिका आहे देवयानी. लेखकाने देवयानीचे अत्यंत आकर्षक असे व्यक्तिमत्व रंगवले आहे. देवयानी ही आमदार शिरगुपे यांची शिक्षित कन्या आहे. तिचे दलित तरूण सागर बनसोडे याच्यावर प्रेम आहे. या प्रेमातून ती गरोदर झालेली आहे. तिला दलित तरूण सागर बनसोडेबरोबर लग्न करावयाचे आहे. या गोष्टीला तिच्या घरातून विरोध होतो. तरीही देवयानी आपल्या निर्णयापासून तसूभरही ढळत नाही. ''लग्न करीन तर त्याच्याशीच, नाहीतरी नाही.'' (पृ. ९४) असे म्हणून ती आपल्या निर्णयावर ठाम होती. याचा परिणाम म्हणून शेवटी तिचा खून केला जातो. समाजामध्ये असे अनेक प्रकरण घडत असतात. दलित तरूण सर्वण तरूणीवर जेव्हा प्रेम करतो आणि हे प्रेमप्रकरण उघडकीस येते तेव्हा दलित तरूणचा खून होतो आणि त्याच्या कुटुंबाचा छळ केला जातो. अशा प्रकारच्या बातम्या वाचायला मिळतात. लेखकाने अशाच स्वरूपाच्या बातमीचा वापर कादंबरी लेखनासाठी केलेला दिसून येतो. देवयानी आणि सागर बनसोडे यांचे प्रेम अत्यंत कल्पकतेने रंगवले आहे. देवयानी प्रकरणामुळे या कादंबरीची रंगत आणखीन वाढलेली आहे.

'ओ' या कादंबरीतील चौथी नायिका ही कस्तुरी आहे. ही धर्म्याची बहीण आहे. धर्म्यावर खुनाचा आरोप असल्याने तिच्या बहिणीचे म्हणजे कस्तुरीचे लग्न होत नाही. ती तरूण आहे. धर्म्याची बहीण विवाहयोग्य असूनही विवाह होत नसल्याने ती अस्वस्थ आहे. या कादंबरीमध्ये धर्म्याची बहीण अशोक कांबळे या दलित तरूणाबरोबर रस्त्यावर उभे राहून बोलण्याचा प्रसंग दाखवलेला आहे. या एका प्रसंगामुळे धर्म्याच्या बहिणीच्या चारित्र्यावर शिंतोडे उडवण्यात आलेले आहेत. शेवटी धर्म्याची बहीण कस्तुरी बंडखोरी करताना दिसते. जे देवयानीला जमले नाही ते कस्तुरी करून दाखवताना दिसते. कादंबरीच्या शेवटी धर्म्याची बहीण महारवाड्यात जाते आणि

अशोक कांबळे या महार तरूणाशी लग्न करण्याचा मनोदय व्यक्त करते. यामुळे गावातील तरूण प्रक्षुब्ध होतात आणि तिचा खून करण्यासाठी महारवाड्यात जातात. तेव्हा अशोक कांबळेचा आजोबा कोंडिबा महार जमावाला उद्देशून म्हणतो, ''आमच्याशी इतकं वैर करण्याचं कारण काय? कळू द्या तरी. आम्ही तुमची चोरी केली? दरोडा टाकला? काय केलं? आम्ही तुमच्या मुसऱ्यावर जगतो. तुमच्या घरात येत नाही? तुमच्या मंदिरात येत नाही? तुमच्या स्मशानात येत नाही. तुमच्यापासून चार हात दूर राहतो. तुम्हाला आमची सावलीदेखील चालत नाही. आमचा तुम्हाला विटाळ होतो. आम्ही गावाबाहेर राहतो. तुमची कामं करतो. रस्ते झाडतो. मेलेली जनावरं ओढतो. गाव राखतो. कधी मान वर करून बघत नाही. आरेला कारे करत नाही. तुमची थुंकी झेलून जगतो. आम्ही भीक मागून खातो. तरी तुम्ही आमचा छळ करताय? आम्ही चांगल्या घरात राहत नाही. चांगलं अन्न खात नाही. चांगलं पाणी पीत नाही. चांगले कपडे घालत नाही. आम्ही नीटनेटकं राहिलेलं तुम्हाला आवडत नाही. तुम्ही आमची शेतं हिरावून घेतली. सुख हिरावून घेतलं. आम्हाला नागवलं. काय आहे आमच्याजवळ? गाढवं, कुत्री, डुक्करं, झाडू. तरीही तुम्ही आमच्या जीवावर उठता? आम्ही काय केलंय? आम्ही अस्पृश्य असलो, तरी माणसं आहोत. आमची वेदना तुम्हाला कळत नाही? आम्हालाही जीव आहे. मन आहे. तुम्ही कधीतरी आमच्या हाकेला 'ओ' दिलाय?

आम्ही कधी तुमच्या विरोधात गेलो नाही. कितीही अन्याय केला तरी गाव सोडलं नाही. गावाच्या सावलीला धरून जगलो. आज अखेरचं सांगतो, पोरगी तुमच्या ताब्यात देणार नाही. मी भीक मागून तिचा सांभाळ करेन.'' (पृ. १४६) अशा प्रकारे अत्यंत आश्वासक असा 'ओ' या कादंबरीचा शेवट केलेला आहे. धर्म्याची बहीण–कस्तुरी ही वाचकांच्या कायम लक्षात राहील, अशी व्यक्तिरेखा आहे.

लिंबाळे यांच्या 'ओ' कादंबरीमध्ये चार नायिका आहेत. तरीही ही नायिकाप्रधान कादंबरी नाही. लिंबाळेंच्या कादंबऱ्यांचे हे खास वैशिष्ट्ये आहे. ते कधीही एका विषयाला केंद्रित ठेवून कादंबरी लिहीत नाहीत. त्यांच्या कादंबरीला जवळजवळ मुख्य कथानक नसतेच. ही लिंबाळे यांच्या लेखनाची खासियत आहे. अनेक उपकथानके, अनेक व्यक्तिरेखा यांच्या सहाय्याने कादंबरी लिहिण्याचा लेखकाचा प्रयत्न असतो.

रूढ कादंबरी प्रकाराला फाटा देणारा हा प्रकार आहे. लिंबाळे जाणीवपूर्वक कादंबरी या वाङ्मयप्रकाराला नवीन परिमाण देताना दिसतात.

लिंबाळे यांची 'ओ' ही कादंबरी केवळ हिंसा, सेक्स आणि रहस्य यांच्यावर आधारलेली नाही, हेही लक्षात घेतले पाहिजे. ते लिहितात एक आणि त्यांचे लक्ष्य दुसरीकडेच वेधलेले असते. ही दुसरी बाजू दुय्यम वाटत असली तरी कादंबरीच्या शेवटी ती महत्त्वाची बाजू ठरते.

'ओ' ही कादंबरी राजकीय कादंबरी आहे. या कादंबरीमध्ये त्र्यंबकराव डोलारे हा दलित मुख्यमंत्री दाखवलेला आहे. दलित मुख्यमंत्री असताना दलितांवर कसे अन्याय होतात याचे भडक वर्णन वर्तमानपत्रातून त्यांचे विरोधक छापून आणतात. दलित मुख्यमंत्र्याला बदनाम करणे, त्याला राज्य चालवता येत नाही, अशी त्याची कमजोर प्रतिमा निर्माण करणे आणि जातीयवादी कारस्थाने करणे, याचे चित्रण या कादंबरीमध्ये केलेले आहे. अरूण साधू यांच्या 'सिंहासन' या कादंबरीची आठवण करून देणारी ही कादंबरी आहे. दलित मुख्यमंत्री झाल्यामुळे अनेक दावेदारांचे धाबे कसे दणाणतात? आणि ते कसे असंतुष्ट होतात? याचे प्रत्ययकारी वर्णन या कादंबरीत वाचायला मिळते. लिंबाळे यांच्या कादंबऱ्या या राजकीय आणि वैचारिक कादंबरीच्या धाटणीने निर्माण झालेल्या आहेत. त्यामुळे इतर दलित लेखकांच्या कादंबऱ्यापेक्षा लिंबाळे यांच्या कादंबऱ्या या विलक्षण वेगळ्या वाटतात.

लिंबाळे यांची 'ओ' ही कादंबरी लघुकादंबरीच्या धाटणीची आहे. दीडशे पृष्ठांची ही कादंबरी आहे. या छोटेखानी असलेल्या कादंबरीत अन्यायानं होरपळणाऱ्यांच्या हाका आणि आक्रोश ऐकू येतात. त्याचबरोबर समाजातले जातीयवादी फुत्कार वाचकांच्या मनात निनादत राहतात. या कादंबरीतील सत्य हे सत्य म्हणून स्वीकारावं, तर शरम वाटते आणि नाकारावे तर सामाजिक गुन्हा वाटतो. अशा प्रकारची 'ओ' ही कादंबरी आहे. समाजातील अन्याय चव्हाट्यावर आणणारा तरूण सागर बनसोडे जसा लक्षात राहतो, तसा मस्तवाल राजकारणी शिरगुपेही वाचकाच्या मनात चीड निर्माण करतो. सत्ता, संपत्ती आणि जात यामुळे गुन्हे कसे होतात आणि गुन्हेगार कसे उजळ माथ्याने समाजात वावरतात, याचे भेदक वर्णन 'ओ' या कादंबरीत केलेले आहे.

लिंबाळेंच्या 'ओ' या कादंबरीमध्ये अनेक सवर्ण पात्रे आहेत. दररोज संध्याकाळी

ते गावाबाहेर फिरायला जातात. रस्त्याने फिरत असताना ज्या गावगप्पा मारतात. त्यातून ही कादंबरी आकाराला आलेली आहे. लिंबाळेंनी गावातले सुशिक्षित बेकार तरूण आणि गावगप्पा यांच्या आधारे 'ओ' या कादंबरीचे लेखन केलेले आहे. ही कादंबरी ग्रामीण राजकारणाचे हबेहुब चित्र डोळ्यांपुढे उभे करते. कादंबरी वाचून वाचक सुन्न होतो. पोलीसबळाचा गुन्हे मिटवण्यासाठी राजकारणी कसे सिताफीने वापर करतात याचेही चित्रण या कादंबरीत लेखकाने केलेले आहे. लिंबाळेंच्या इतर कादंबऱ्यांपेक्षा 'ओ' ही कादंबरी आकाराने लहान असली तरी आश्य आणि विषयाच्या दृष्टीने ती इतर कादंबऱ्याप्रमाणेच परिणामकारक आहे. त्यामुळेच ती वाचकांच्या मनात कायमची घर करून राहते.

याशिवाय सीता महारीण, पी. आय. सरदेशमुख, आमदार रमेश वाकडे आणि आमदार शिरगुपे, ॲडव्होकेट गोपाळ पुरोहित या कादंबरीतील लक्षात राहणाऱ्या व्यक्तिरेखा आहेत.



ISSN 2249-0817 WARUL

# शरणकुमार लिंबाळे यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व

**– संजय कांबळे, बेळगांव**

एखादा लेखक, कवी, समीक्षक याचा जीवनविषयक दृष्टिकोन समजून घेण्यासाठी व त्याच्या समग्र साहित्यकृतींचे आकलन होण्यासाठी लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेणे अपरिहार्य असते. म्हणून लेखकाच्या वाङ्मयीन जडणघडणीचा विचार करताना त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीचा विचार करणे महत्त्वाचे असते. साहित्यिकाने निर्माण केलेल्या साहित्यकृतीच्या निर्मितीप्रक्रियेत त्यांचे अत्यंत महत्त्वाचे स्थान असते. साहित्यिकाचे जीवनानुभव आणि साहित्यिकाचे व्यक्तित्व ह्यांच्या द्वंद्वात्मक संबंधातून साहित्याची निर्मिती होत असते. अशाच साहित्यनिर्मितीतून साहित्यिकाचे जीवनदर्शन व त्याचे व्यक्तिमत्त्व स्पष्ट होते. म्हणून व्यक्तिमत्त्व म्हणजे काय हे तपासणे गरजेचे होऊन बसते.

व्यक्तिमत्त्व म्हणजे व्यक्तीच्या एकंदर वर्तन वैशिष्ट्यांचे सर्वांगीण रूप असते. व्यक्तिमत्त्वामध्ये माणसाचा स्वभाव, श्रद्धा, विविध प्रकारचे दृष्टिकोन, मतमतांतरे, कलाभूमिका, जीवनभूमिका, अभिरुची, स्वभावातील संयमशीलता, भावनाप्रधानता व विचारशीलता इ. अनेक गोष्टींचा समावेश होत असतो. अशा स्वरूपाच्या संदर्भातून साहित्यिकाचे व्यक्तिमत्त्व घडत असते. लहानपणी आजी–आजोबा, आई–वडील, भावंडे, शाळेतील गुरुजनांचे, मित्रांचे त्याच्यावर वेगवेगळ्या स्वरूपाचे संस्कार घडत त्याचे व्यक्तिमत्त्व घडत जाते. शेवटी जाणत्या वयात समाजातील स्थित्यंतराचे, भोवतालच्या सामाजिक पर्यावरणाचे संस्कार प्रत्यक्ष, अप्रत्यक्षरीत्या त्यांच्यावर घडत असतात.

वि. वा. शिरवाडकर ह्यांचे मत विचारात घेणे आवश्यक आहे. ते म्हणतात, लेखकाचे व्यक्तिमत्त्व म्हणजे वाङ्मयीन, सामाजिक व आंतरिक असे संमिश्रण असते. त्याच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वास लेखकाला जात्याच असणारी वाङ्मयाची आवड, लेखकापाशी असणारा वाङ्मयनिर्मितीचा उपजत गुण, प्रतिभा, स्फूर्ती, कलात्मकतेची जाण, वाङ्मयीन ग्रंथाचे विपुल वाचन, त्याविषयी आवड, चिंतन, मनन त्यातून लेखकाच्या व्यक्तिमत्त्वावर झालेले वाङ्मयीन संस्कार, प्राप्त झालेले

वाङ्मयीन लेखनाचे कौशल्य व भाषाप्रभुत्व आणि संपन्न शब्दसंग्रह या बाबींचा समावेश होतो. समाज व व्यक्ती यांचे संबंध जन्मजात, स्वाभाविक, अतूट व अपरिहार्य आहेत. सामाजिक संस्कारातून व्यक्तिमत्त्व घडते. लेखकाच्या संवेदनशील मनाने येणारी सामाजिक अनुभूती टिपली जाते. त्यातून लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाला अनुभवसंपन्नता प्राप्त होते. लेखकाचे हळवे, उत्कट, संवेदनशील मन प्रसंगी अशा अनुभूतीविषयी क्रियाप्रतिक्रिया प्रकट करीत असते. लेखकाच्या खऱ्या व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय हा आंतरिकच असतो. लेखकाच्या मनावर झालेले संस्कार, त्यातून त्याच्या मनाची झालेली बांधणी, मनाची संपन्नता, लेखकाचे आंतरिक भावविश्व या बाबी म्हणजे लेखकाचे आंतरिक जगत होय. म्हणून एखाद्या लेखकाच्या साहित्याचा अभ्यास करत असताना त्या साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेणे अपरिहार्य असते.

**व्यक्तिमत्त्वाची जडणघडण :**

शरणकुमार लिंबाळे हे मराठी साहित्यातील ‘दलित साहित्य’ प्रवाहातील महत्त्वाचे कवी, लेखक, आत्मकथनकार, समीक्षक आहेत. त्यांनी आपल्या वाङ्मयीन वाटचालीमध्ये साहित्याचे जवळ जवळ सर्वच साहित्यप्रकार यशस्वीरित्या हाताळून, मराठी साहित्यामध्ये स्वत:चे स्वतंत्र स्थान निर्माण केले आहे. अशा ह्या प्रयोगशील, हरहुन्नरी, लोकप्रिय साहित्यिकाच्या वाङ्मयीन वाटचालीचा परामर्श घेण्यापूर्वी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कशी झाली हे पाहणे गरजेचे आहे.

**जन्म :** शरणकुमार लिंबाळे यांचा जन्म १ जून, १९५६ रोजी सोलापूर जिल्ह्यातील हन्नूर या गावी झाला. त्यांची आई जातीने महार. तिचे नाव मसामाय. तर बाप सवर्ण लिंगायत पाटील, हणमंता लिंबाळे. आई महार व बाप सवर्ण लिंगायत अशा विवाहबाह्य अनैतिक संबधामधून जन्मलेल्या शरणकुमार लिंबाळे यांना आयुष्यभर ’अक्करमाशी’ पणाच्या वेदना भोगाव्या लागल्या आहेत. शरणकुमार लिंबाळे ‘अक्करमाशी’ म्हणून स्वजातीचा महार समाज त्यांना स्वीकारण्यास तयार नाही. तर लिंगायत सवर्ण समाज हणमंता लिंबाळेंच्या रखेलीच पोर म्हणून स्वीकारण्यास तयार नाही. अशा विचित्र अवस्थेत सापडलेल्या शरणकुमार लिंबाळे यांना सतत अस्तित्वासाठी, हक्कासाठी जीवघेणा संघर्ष करावा लागला

आहे. शरणकुमारांचा पोटच्या पोराप्रमाणे त्यांची आजी संतामाय (आईची आई) हिने सांभाळ केला. तर मुस्लीम दादा महम्मद दस्तगीर जमादार यांनी हमाली करून शरणकुमारला लहानाचे मोठे करण्यात, त्यांना घडविण्यात महत्त्वाची भूमिका बजावली आहे. शरणकुमार लिंबाळे यांचे काका यशवंत सिद्रामप्पा पाटील याने मसामायला रखेली म्हणून ठेवले, शरणचा सांभाळ करण्यात त्यांचा महत्त्वाचा वाटा आहे. एकूणच शरणकुमार लिंबाळे यांना आयुष्यभर अस्पृश्यतेच्या वेदनेबरोबरच 'अक्करमाशी'पणाच्या विचित्र दाहक वेदना सोसाव्या लागल्या आहेत. पुढे या वेदनेला 'अक्करमाशी' आत्मकथन लिहून वाचा फोडण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे.

**बालपण:**

विवाहबाह्य अनैतिक संबंधामधून जन्मलेल्या शरणकुमार लिंबाळे यांचे संपूर्ण बालपण दारिद्र्य, उपासमार, अस्पृश्यतेचे दाहक चटके तसेच 'अक्करमाशी'च्या वेदनेनी करपून गेले. शरणकुमार लिंबाळे यांच्या आईला, मसामायला बासलेगावच्या पाटलाने, हणमंता लिंबाळे यांनी सोडल्यानंतर पुन्हा मसामाय माहेरात हन्नूरचा पोलीस पाटील यशवंत सिद्रमपा पाटील यांची 'रांड' म्हणून राहिली. या सर्व अनैतिक व्यवहाराचा परिणाम बालपणी शरणकुमार लिंबाळे यांच्यावर झाला. बालसुलभ वयामध्ये आई–वडिलांच्या प्रेमाला भुकेल्या असलेल्या शरणकुमारांना लहानपणी आईवडील यांपैकी कुणाचेच प्रेम मिळाले नाही. म्हणून शरणकुमार आपल्या आईच्या प्रेमाविषयी म्हणतात, 'मला माझ्या आईचं पूर्ण प्रेम मिळाले नाही. ती माझी पूर्ण आई कधीच नव्हती. ती माझी अर्धी आई, तर अर्धी पाटलाची बाई होती. तिला पाटलाची मर्जी सांभाळावी लागे. अशा परिस्थितीत तिनं कधीतरी माझ्या पाठीवरून हात फिरवला तर तिचा स्पर्श मला जीवन देणारा वाटायचा. वठलेल्या झाडाला पालवी दिल्यासारखा.' बालपणी शरणकुमारांना आईवडिलांचे प्रेम मिळाले नाही. मात्र त्यांचा सांभाळ पोटच्या पोराप्रमाणे शरणच्या आजीने म्हणजे संतामायने केला. शरणला संतामायने तळहाताच्या फोडाप्रमाणे जपले. दारिद्र्यामध्ये भीक मागून, प्रसंगी शेणातील पिवळी ज्वारी खाऊन तिने दिवस काढले, परंतु नायकाला काही कमी पडू दिले नाही.

शरणकुमारांना लहानपणी दारिद्र्यात दिवस काढताना दारू आणणे, विकणे, मृत जनावरांचे मांस कापणे, तसेच जनावराची कातडी काढण्यासाठी मदत करणे अशी हलकी कामे करावी लागली आहेत. घरात अठराविश्वे दारिद्र्य असताना व त्यातून जगताना त्यांना अनेक कठीण प्रसंगाना सामोरे जावे लागले. पोटाची खळगी भरण्यासाठी भाकरीचे शिळे तुकडे खाऊन दिवस काढावे लागले. गावात लग्न समारंभामध्ये पोटासाठी अपमानास्पद तिष्ठत उभे राहावे लागले. इतकेच नाहीतर ताटातून घरी खीर आणत असताना मार खावा लागला. म्हणून अक्करमाशीतील नायक शरण म्हणतो, 'देवानं पोट देऊन चूक केलीय' शरणकुमार लहान असताना मढ्यावर उधळलल पैसे घेतो. मढ्याला इसावा देण्यासाठी जेव्हा प्रेत खाली ठेवलेले असते, त्यावेळी इसाव्यासाठी सीवारी शरण घेतो. त्यावेळी शरणला आनंद होतो. त्याला वाटते असे मेताची मडी निगावीत. पैसे उधळावेत. मला तितकेच पैसे मिळत्याल. इसाव्यासाठी  मिळेल. शरणकुमार लिंबाळे यांचे संपूर्ण बालपण अस्पृश्यतेच्या व अक्करमाशीच्या वेदनेनी घायाळ झाले आहे.

शरणकुमार लिंबाळे यांची आजी संतामाय हीने शरणला लहानाचे मोठे केले. खूप प्रेम दिले आपल्या दरिद्री जीवनातही तिने नायकाचे कोडकौतुक केले. तिला एकच मूल झाल्याने नवऱ्याने तिला नांदवले नाही. आपली एकुलती एक मुलगी मसामायला घेऊन ती हन्नूरात राहू लागली. बस स्टँडवर हमाली करणाऱ्या महमूद दस्तगीर जमादार या मुस्लीम समाजातील व्यक्तीबरोबर तिने संसार थाटला. शरणला घडविण्यात या दोघांचा खूप मोठा वाटा आहे. संतामाय त्याची मुलाप्रमाणे काळजी घ्यायची, तर दादा महामूद दस्तगीर हे त्याला चिमण्याकावळ्याच्या गोष्टी सांगायचे. त्याचे काका म्हणजे मसामायचा दुसरा पाटील नवरा यशवंतराव सिद्रामपा पाटील. त्याला रामायण-महाभारतातल्या गोष्टी सांगायचे. धार्मिक ग्रंथ वाचायला आणून द्यायचे. एकाचवेळी महार, लिंगायत आणि मुस्लीम या तीन जातीच्या संस्कारात शरणची वाढ होते. आपण आपल्याला कोणत्या जातीचे मानावे याबद्दल शरणच्या मनात संभ्रम निर्माण झालेला आहे. शरण म्हणतो, 'माझी आई महार तर वडील लिंगायत.... म्या सवर्ण का? तर माय अस्पृश्य. म्या अस्पृश्य का ? तर बाप सवर्ण. म्या जरासंधासारखा अर्धा

गावात तर अर्धा गावाबाहेर फेकलेला. म्या कोण ? माझी नाळ कुणाशी?' शरणची ही जरासंधासारखी अर्धी अवस्था त्याचे बालपण उद्ध्वस्त करते.

**शिक्षण :**

शरणकुमार लिंबाळे यांचे प्राथमिक शिक्षण हन्नूर या गावी झाले, तर माध्यमिक शिक्षण चुंगी, चपळगाव या ठिकाणी झाले. शरणकुमार लिंबाळे बी. ए. ची परीक्षा पास झाल्यानंतर त्यांना एम. ए. चे शिक्षण घ्यायचे होते. परंतु दरम्यानच्या काळात त्यांना अहमदपूर (जि. लातूर) येथे टेलिफोन खात्यात नोकरी मिळाल्याने त्यांचे एम. ए. चे शिक्षण त्यावेळी होऊ शकले नाही. पुढे 'आकाशवाणी' सोलापूर केंद्रावर नोकरी करीत असताना दयानंद महाविद्यालयाचे प्राचार्य बनसुडे यांच्या प्रेरणेमुळे शरणकुमार यांनी एम. ए. च्या दोन्ही वर्षाची तयारी केली व परीक्षेचा अर्ज भरला. परीक्षेच्या कालावधीमध्ये शरणकुमारांच्या बहिणीने – वनीने अंगावर रॉकेल ओतून पेटवून घेतले. अशा मानसिकदृष्ट्या अस्वस्थ असलेल्या पारस्थितीमध्ये लिंबाळे यांनी परीक्षा दिली. ते उत्तीर्ण झाले. पुढे वरिष्ठ महाविद्यालयात अधिव्याख्याता म्हणून आवश्यक असणारी 'नेट' परीक्षा शरणकुमार लिंबाळे पास झाले. मात्र त्यांना बी. ए. ला क्लास नसल्यामळे ते विविध महाविद्यालयातील अधिव्याख्याता पदाच्या मुलाखतीमध्ये अपात्र ठरले. त्यानंतर त्यांनी शिवाजी विद्यापीठामधून डॉ. ल. रा. नसिराबादकर यांच्या मार्गदर्शनाखाली 'दलित साहित्याच्या समीक्षेचा चिकित्सक अभ्यास' या विषयावर संशोधन पूर्ण करून पीएच. डी. ही पदवी प्राप्त केली.

**नोकरी :**

शरणकुमार लिंबाळे यांच्या नोकरीची सुरुवात 'टेलिफोन ऑपरेटर' या पदापासून झाली. त्यांनी 'टेलिफोन ऑपरेटर' पदासाठी तीन महिने नाशिकमध्ये ट्रेनिंग घेतले. त्याच्यानंतर लिंबाळे यांचे पोस्टिंग अहमदपूर (जि. लातूर) येथे झाले. तो काळ मराठवाडा विद्यापीठाला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे नाव देण्याचा, नामांतर चळवळीचा होता. त्यामुळे सगळीकडे नामांतर प्रश्नावरून दंगली चालू होत्या. अशावेळी शरणकुमार लिंबाळे यांना आपली महार जात लपवून राहावे लागले. त्यावेळी अहमदपूरच्या टेलिफोन एक्सचेंजमध्ये सुधीर

गव्हाणे हे टेलिफोन ऑपरेटर म्हणून काम करत होते. त्यांनी शरणकुमार लिंबाळे यांना आधार व साहित्यनिर्मितीसाठी प्रेरणा दिली.

त्यानंतर लिंबाळे यांची बदली लातूरला झाली. या नव्या शहरात लिंबाळेंना पुन्हा त्रास सुरू झाला. महार जात आडवी येत राहिली. त्यामुळे त्यांच्या राहण्याचा प्रश्न गंभीर झाला. शेवटी भीमनगरमध्ये घर मिळाले. मात्र घरापाठीमागे स्मशान असल्यामुळे जगणे असह्य व्हायचे. त्यानंतर लिंबाळे यांची सोलापूरला बदली झाली. सोलापुरातील नोकरीच्या निमित्ताने लिंबाळे यांना बँकेत खाते उघडताना 'अक्करमाशी'च्या दाहक वेदनेनी घायाळ केले. बँकेत मॅनेजरने लिंबाळेंना पूर्ण नाव विचारल्यानंतर लिंबाळे यांनी 'शरणकुमार लिंबाळे' असे आपले नाव सांगितले. मात्र ह्या अपूर्ण बाप नसलेल्या नावाने बँक मॅनेजरचे समाधान झाले नाही. कारण 'शरणकुमार लिंबाळे' हे पूर्ण नाव होऊ शकत नाही असे मॅनेजरचे म्हणणे. शेवटी लिंबाळे यांच्या अशोक जेटीथोर या मित्राने मध्यस्थी करून लिंबाळे यांचे 'अक्करमाशी'पणाचे दु:ख उलगडून सांगितले.

अशा पद्धतीने टेलिफोन खात्यातील नोकरी शरणकुमार लिंबाळेच्या 'अक्करमाशी'पणाच्या व अस्पृश्यतेच्या दाहक वेदनांच्या अनुभवातून गेली. त्यांनी या खात्यामध्ये सात-आठ वर्षे नोकरी केली.

पुढे शरणकुमार लिंबाळे यांनी सोलापुरात नव्याने आकाशवाणी केंद्र सुरू झालेल्या ठिकाणी उद्घोषकाची नोकरी केली. या ठिकाणी नोकरी करत असतानाही त्यांना अनेक अडचणी आल्या. लिंबाळेंचा आवाज चांगला नसल्याने तसेच शब्दांचे उच्चार स्पष्ट होत नसल्याने त्यांच्या विरुद्ध श्रोत्यांच्या तक्रारी यायच्या. त्यामुळे माईकवरून बोलताना त्यांच्या मनावर प्रचंड दडपण असायचे. अशावेळी ऋषीकेश आयचित आणि सुनीता तारापुरे यांनी आकाशवाणीतल्या नोकरीमुळे दयानंद महाविद्यालयातील प्राचार्य बनसुडे याशी लिंबाळेंची ओळख झाली. त्यांनी लिबाळेंना एम. ए. करण्यासाठी व वरिष्ठ महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून नोकरी करण्यासाठी सल्ला व प्रेरणा दिली. शरणकुमार लिंबाळे एम. ए. पास झाले.

शरणकुमार लिंबाळे यांना अधिव्याख्याता म्हणून काम करण्याची इच्छा व आवड निर्माण झाली. त्यादृष्टीने त्यांनी प्रयत्न चालू केले. औरंगाबादच्या 'सरस्वती भवन' या महाविद्यालयाचे मुलाखतीचे पत्र त्यांना आले. मुलाखतीमध्ये लिंबाळेंना

बी. ए. ला क्लास नसल्यामळे ते गुड अॅकॅडेमिक रेकॉर्डमध्ये बसत नाहीत, म्हणून त्यांना डावलले व पुन्हा मराठी विषय घेऊन बी. ए. करण्याचा सल्ला दिला. मात्र जर पीएच. डी. असेल तर बी. ए.चा क्लास विचारात घेतला जात नाही हे समजल्यावर लिंबाळे यांनी पीएच. डी. साठी नोंदणी केली. त्यांनी शिवाजी विद्यापीठात 'दलित साहित्याच्या समीक्षेचा चिकित्सक अभ्यास' हा विषय घेतला व पीएच.डी.ची पदवी मिळवली. तसेच वरिष्ठ महाविद्यालयात अधिव्याख्याता म्हणून काम करण्यासाठी आवश्यक असणारी 'नेट' परीक्षाही लिंबाळे उत्तीर्ण झाले. त्यानंतर त्यांनी पुणे विद्यापीठात अधिव्याख्याता पदासाठी प्रयत्न केले. मात्र त्यांना यश मिळाले नाही. त्यांनी यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठामध्ये सहायक संपादक पदासाठी अर्ज केला. मुलाखत चांगली झाल्याकारणाने लिंबाळे यांची मुक्त विद्यापीठात निवड झाली.

गुड अॅकॅडमिक रेकॉर्ड नसल्याचे कारण पुढे करून शरणकुमार लिंबाळे यांना बऱ्याचशा ठिकाणच्या महाविद्यालयामधून डावलण्यात आले होते. त्यानंतर लिंबाळे यांचे मित्र महाराष्ट्राच्या समाजकल्याण खात्याचे मंत्री ना. रामदास आठवले यांच्या मदतीने लिंबाळे यांनी मंत्रालयात स्वीय सहायक' म्हणून रामदास आठवले यांचे काम पाहिले. त्यानंतर पुन्हा शरणकुमार लिंबाळे यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठात रुजू झाले. त्यांनी या विद्यापीठात वेगवेगळी पदे भूषविली. यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठामध्ये पुणे विभागाच्या विभागीय संचालक' या प्रतिष्ठित पदावर प्रदीर्घकाळ सेवा करून ते सेवा निवृत्त झाले आहेत.

एकूणच शरणकुमार लिंबाळे यांना नोकरीच्या निमित्ताने वेगवेगळ्या ठिकाणी भटकंती करावी लागली आहे. त्याचबरोबर नोकरीच्या निमित्ताने त्यांना आलेले बरेवाईट अनुभव, पुढे त्याना साहित्यनिर्मितीसाठी उपयोगी पडले आहेत. त्यातूनच त्यांच्या लेखकीय व्यक्तिमत्त्वाची जडणघडण होण्यास मदत झाली आहे.

**वैवाहिक जीवन :**

'अक्करमाशी'पणाच्या दाहक वणव्याचे परिणाम शरणकुमार लिंबाळेच्या वैवाहिक जीवनावर देखील पडले आहेत. लिंबाळे 'अक्करमाशी' असल्यामुळे त्यांना कोणीच मुलगी देण्यास तयार नाही. त्यांच्या 'अक्करमाशी' मुळेच स्वजातीतील

असणाऱ्या शेवंताबरोबरचे प्रेमही यशस्वी होऊ शकले नाही. सगळीकडे त्यांच्या वाट्याला उपेक्षा व अपमानित जगणे आले. शेवटी मयप्पा कांबळे या धर्मांतरित बौद्ध व्यक्तीने त्यांची कुसुम नावाची मुलगी लिंबाळेंना देण्याचे धाडस केले. परंतु लग्नानंतरही लिंबाळेंची कर्मकहाणी संपलेली नाही. कुसुमची आई कुसुमला नांदायला पाठविण्यास नकार देते. शरणकुमार कुसुमच्या घरी बार्शीला जाऊन कुसुमला नांदण्यास पाठविण्याची विनंती करतो. परंतु सासू मात्र कुसुमला नांदायला पाठवत नाही. शरणकुमार लिंबाळेंचा द्वेष करीत ती म्हणते, 'तुम्ही नासकेकुजके हाव. तुमाला आमी शुद्ध केलय. उकिरड्यावर पडलतो.' विवाह झाल्यानंतरही लिंबाळेंची सगेसोयऱ्यांकडून होणारी कुचंबणा थांबलेली नाही. शेवटी लिंबाळे यांना कुसुमला पळवून नेणे भाग पडले. पुढे शरणकुमार लिंबाळे व कुसुम यांच्या वैवाहिक सुखी जीवनात 'शरणकुमार लिंबाळे व स्वाती' यांच्या प्रेमप्रकरणामुळे वादळ आले. स्वाती प्रकरणावरून फार मोठा संघर्ष निर्माण झाला. हा संघर्ष शरणकुमार लिंबाळे यांनी 'बारामाशी' व 'राणीमाशी' या आत्मकथनात मांडला आहे. शेवटी शरणकुमारांचे मित्र, स्वकीयांच्या प्रयत्नामुळे लिंबाळे यांचे वैवाहिक जीवन बरबाद होण्यापासून वाचले आहे. त्यांना अस्मिता, अमोल व अनघा अशी तीन मुले आहेत.

साहित्यिकाच्या लौकिक व्यक्तिमत्त्वापेक्षा वाङ्‌मयीन व्यक्तिमत्त्व हे स्वभावात:च अधिक जटिल व तर्कातीत असते. त्यामुळे ते लौकिक व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंब होऊच शकत नाही. लौकिक व्यक्तिमत्त्व हे समाजसापेक्ष असल्याने त्याला एक प्रकारची स्थितीशीलता व बोथटपणा आलेला असतो. ह्यासंदर्भात वि. वा. शिरवाडकर आपले विचार मांडताना म्हणतात. 'जीवनाच्या ज्या भरात आपण वावरतो, जगतो, त्यापासून साहित्य हे अलग काढता येईल, हे शक्य नाही. साहित्यिकाची प्रतिभा कितीही आकाशमार्गी असली, तरी त्याचे पाय पृथ्वीवर टेकलेले असतात. लेखकाचे व्यक्तिमत्त्व हे त्याच्या वाङ्‌मयाचे अधिष्ठान असते, हे कोणीच नाकारीत नाही. परंतु हे व्यक्तिमत्त्वसुद्धा सामान्यतः मानलं जातं, तितकं स्वयंभू आणि स्वतंत्र असते. ह्या परिसरातील परिस्थितीचे नानाविध संस्कार त्याच्यावर होत असतात व त्या क्रिया प्रतिक्रियांतनच त्याला विशिष्ट आकार, विशिष्ट रंग प्राप्त होतो. शेवटी साहित्यिकाची साहित्यनिर्मिती हा त्याचा

आत्मनिष्ठ आविष्कार असल्यामुळे त्याच्या वाङ्‌मयीन व्यक्तिमत्त्वाचा परिचय करून घेणे महत्त्वाचे ठरते.

शरणकुमार लिंबाळे यांनी वाङ्‌मयीन वाटचालीमध्ये मराठी साहित्यातील 'दलित साहित्य' या प्रवाहामध्ये लेखन केले. त्यांनी महामानव डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारकार्यातून व लेखनकार्यातून प्रेरणा घेऊन साहित्यनिर्मिती केली. त्यांच्या लेखनप्रपंचामध्ये 'अक्करमाशी', 'बारामाशी', 'राणीमाशी' ही आत्मनिवेदनात्मक पुस्तके, 'उत्पात' व 'श्वेतपत्रिका' हे काव्यसंग्रह, 'भिन्नलिंगी', 'उपल्या', 'हिंदू', 'बहुजन', 'झुंड', 'ओ', 'सनातन' या कादंबऱ्या, 'हरिजन', 'रथयात्रा' हे कथासंग्रह तर दलित साहित्याचे सौंदर्यशास्त्र, साहित्याचे निकष बदलावे लागतील. ब्राह्मण्य,दलित आत्मकथा एक आकलन यासारखे समीक्षा ग्रंथ अशी विपुल ग्रंथनिर्मिती करून साहित्यसेवा बजावली आहे.दलित लेखक हा आत्मकथन लिहून संपतो अशी या साहित्यावर टीका होत असते.मात्र शरणकुमार लिंबाळे यांनी साहित्याच्या सर्वच प्रकारामध्ये विपुल ग्रंथनिर्मिती करून ही टीका गैर असल्याचे दाखवून दिले आहे.

एकूणच इतकी विपुल प्रमाणात साहित्यनिर्मिती करणारे तसेच 'दलित साहित्य' प्रवाहात स्वतःचे असे स्वतंत्र स्थान निर्माण करणारे शरणकुमार लिंबाळे हे महत्त्वाचे कवी, लेखक, समीक्षक व संपादक आहेत. शरणकुमार लिंबाळे यांनी दलित साहित्याची समीक्षा करत असताना रूढ समीक्षेच्या निकषांना नकार देऊन वेगळ्या सौंदर्यशास्त्राची मांडणी केली. अशा या साहित्यिकाची वाङ्‌मयीन जडणघडण होत असताना कोणत्या सामाजिक पर्यावरणाने त्यांची वाङ्‌मयीन जाण जागृत झाली तसेच त्यांनी वाङ्‌मयनिर्मिती करत असताना कोणती वाङ्‌मयीन जीवनजाणीव स्वीकारली ह्याचा अभ्यास करावा लागेल आणि त्यांच्या साहित्याची प्रेरणा व भूमिका तपासणे महत्त्वाचे ठरेल.

**बालपणातील वाङ्‌मयीन संस्कार :**

शरणकुमार लिंबाळे लहान असताना त्यांचे काका (हन्नूरचे पोलीस पाटील, यशवंतराव सिद्रामप्पा पाटील) त्यांच्या घरी राहायचे. रात्री काकांचे शरण पाय तुडवत व मग काका छोट्या शरणला गोष्टी सांगायचे. कधी रामायण महाभारतातील कथा तर कधी 'सिंहासन बत्तिशी', ''वेताळ पंचविशी'मधील कथा सांगत. ह्या

पुराणकाळातील गोष्टी ऐकत असतानाच काकाकडून शरणला 'पांडवप्रताप', 'हरिविजय', 'रामायण', 'शिवलीलामृत', 'नवनाथ कथासागर', 'मार्कंडेय पुराण', 'वेताळ पंचविशी', 'सिंहासन बत्तिशी', 'तोता–मैना' अशी कितीतरी पुस्तके वाचायला मिळाली. तसेच 'भगवद्गीता', 'सत्यार्थप्रकाश' ह्यासारखे ग्रंथ वाचायला मिळाले. म्हणून या ग्रंथाविषयी लेखक म्हणतो, ह्या कथांनी माझं बालपण भरून गेले होतं. पुढे विद्रोही साहित्यनिर्मिती करणाऱ्या शरणकुमार लिंबाळे यांनी या साहित्यापासून प्रेरणा तर घेतली नाही, मात्र त्यांना वाचनाची आवड लागली असे म्हणावे लागेल.

त्यांनंतर पुढे सहावीमध्ये शिकत असताना महारवाड्यातील लोकांनी म. आ. कारंडे लिखित 'नवी वाट' नावाचे नाटक केले होते. ह्या नाटकाच्या प्रभावामुळे लिंबाळे यांनी दहा पानांची एकांकिका लिहिली. ती त्यांनी त्यांच्या वर्गशिक्षकांना, मल्ला गुरूजींना दाखविली. मात्र ते अनुकरण असल्याचे भोसले गुरुजींनी सांगितले. तसे पाहिले तर तो अनुकरण करण्याचाच कालखंड होता. अशा पद्धतीने शरणकुमार लिंबाळे यांना बालपणी वाचनाची व लेखनाची आवड निर्माण झाली.

**महाविद्यालयीन जीवनातील साहित्यनिर्मिती :**

शरणकुमार लिंबाळे महाविद्यालयात शिकत असताना वसतिगृहात राहत होते. वसतिगृहात बहुसंख्य विद्यार्थी दलित होते. त्यामुळे विद्यार्थ्यांच्यामध्ये आपापसात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या कार्याविषयी, विचाराविषयी चर्चा होत असत. त्यावेळी लेखकाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे साहित्य मिळवून वाचून काढले. मात्र अभ्यासक्रमात वेगळेच विश्व वाचायला मिळाले होते. अशावेळी लिंबाळेंची त्याकाळी संभ्रमावस्था निर्माण झाली. त्यामुळे नेमके काय वाचावे हे त्यांना कळत नव्हते. म्हणून लिंबाळे त्याविषयी म्हणतात, 'मध्यमवर्गीय लेखकांनी लिहिलेले काल्पनिक साहित्य वाचत होतो. पांढरपेशी साहित्यावर माझा पिंड पोसला जात होता. आंबेडकरी विचाराने माझ्यातला कर्ता घडत होता, तर काल्पनिक रंजनवादी साहित्यानं माझ्यातला लेखक जागा होत होता.' या वातावरणात साहित्याची निर्मिती केली आहे.

**जीवनवादी साहित्याकडे आकर्षण :**

महाविद्यालयातील जीवनात प्रवेशानंतर लिंबाळे यांची जाण समृद्ध व विकसित होत राहिली. सुरुवातीला त्यांनी अनेक समीक्षेची पुस्तके वाचली. मार्क्सवादी, वास्तववादी व जीवनवादी साहित्य, समीक्षेच्या वाचनाने मार्क्सवादी, वास्तववादी, जीवनवादी हे शब्द जवळचे वाटू लागले. कलावादापेक्षा जीवनवाद महत्त्वाचा वाटू लागला. जीवनवादाने त्यांचे डोळे दिपून गेले. विशेष म्हणजे प्रख्यात स्त्रीलेखिका विभावरी शिरुरकर यांची 'बळी' ही कादंबरी त्याचबरोबर गोदाबाई परूळेकर यांच्या 'जेव्हा माणूस जागा होतो' या पुस्तकांनी त्यांची जीवनविषयक, साहित्यविषयक भूमिकाच बदलून टाकली. त्यामुळे शरणकुमार लिंबाळे जीवनवादाकडे आकर्षित झाले. सवर्ण लेखकांनी लिहिलेल्या दलित जीवनावरील पुस्तके वाचून लिंबाळे यांच्या मनामध्ये ह्या लेखकांविषयी आदर वाटू लागला. म्हणून लिंबाळे त्याविषयी म्हणतात, 'तेव्हा माझ्या मनात अशा पुरोगामी लेखकाविषयी प्रचंड आदर वाटायचा. पुरोगामी लेखक जातिवाद्यांना न भिता लेखन करतात हे त्यांचे क्रांतीकारकत्व वाटायचं. मी जीवनवादी साहित्याकडे आकर्षिला जात होतो.' अशा पद्धतीने शरणकुमार लिंबाळे हे जीवनवादी साहित्याकडे आकर्षित झाले.

**वर्तमानपत्र व नियतकालिकामधून लेखन :**

शरणकुमार लिंबाळे महाविद्यालयात शिक्षण घेत असताना 'दलित पँथर' या संघटनेत काम करत होते. दलित पँथरच्या बैठका, सभा, मोर्चे यातूनच नवीन जन्म झाला. तसेच दलित साहित्य हे चळवळीचे साहित्य असल्यामुळे दलित साहित्याची चर्चा ऐकायला मिळत होती. (पुढे शरणकुमार लिंबाळे यांनी 'दलित पँथर'च्या प्रभावाने प्रभावित होऊन व त्यानंतर दलित पँथरमधील गटबाजी पाहून 'दंगल' ही पँथरवर आधारित लघु कादंबरी लिहिली.) दलित साहित्याविषयी वर्तमानपत्रातील पुस्तक परीक्षणे आणि बातम्या वाचायला मिळत होत्या. त्याचबरोबर मार्क्स, लेनिन, माओ, एंगल्स यांच्या विचाराने प्रभावित होऊन, सुधीर बेडेकर, शरद पाटील, यदुनाथ थत्ते, बाबा आढाव यांच्या भाषणातून समाजवादी विचार जवळचे वाटत होते. अशा या लेखक म्हणून जडणघडण होण्याच्या काळात शरणकुमार लिंबाळे यांच्या मनात प्रचंड अशांतता असताना

काही काल्पनिक प्रेमकविता लिहिल्या. वर्तमानपत्रामध्ये वाचकांची पत्रे लिहिली. त्याचबरोबर दैनिकासाठी, साप्ताहिकांसाठी पुस्तकं परीक्षणे लिहिली. स्त्रियांच्या मासिकासाठी स्त्री स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या कविता लिहिल्या. डाव्या विचारांच्या मासिकांसाठी, साप्ताहिकाकरिता श्रमिकाविषयीच्या कविता लिहिल्या. दलितांच्या मासिकांसाठी दलितांविषयीचे लेख लिहिले.

एकूण या सर्व स्थित्यंतराचा विचार केल्यानंतर या काळात शरणकुमार लिंबाळे यांचा पुढील विद्रोही, स्फोटक कवी व साहित्यिकाचा पिंड घडण्यास या काळात मदत झाली असे म्हणावे लागेल.

**सुधीर गव्हाणे यांची मैत्री :**

शरणकुमार लिंबाळे यांनी बी. ए. ची पदवी घेतल्यानंतर भारत सरकारच्या टेलिफोन खात्यात टेलिफोन ऑपरेटरची नोकरी मिळविली. मराठवाड्यातील अहमदपूर या तालुक्याच्या ठिकाणी त्यांची नेमणूक झाली. तो काळ औरंगाबादमधल्या मराठवाडा विद्यापीठाला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे नाव देण्याच्या नामांतर चळवळीचा होता. अशा या स्फोटक वातावरणामध्ये अहमदपूरमध्ये अनेक जातीय दंगली घडत होत्या. नामांतराच्या बाजूने दलित चळवळ संघटितपणे संघर्ष करीत होती. अशावेळी टेलिफोन खात्यामध्ये काम करणारे सुधीर गव्हाणे यांच्याशी लिंबाळेची मैत्री जुळली. सुधीर गव्हाणे सवर्ण असूनदेखील नामांतरवादी होते. ते वर्तमानपत्रातून नामांतरवादी लेखन करायचे. दलित साहित्य वाचून त्यावर चर्चा करायचे. सुधीर गव्हाणे यांच्याकडून दया पवार लिखित ’कोंडवाडा’ कवितासंग्रह मिळवून तशा प्रकारच्या कविता आपणदेखील करू शकतो अशी जाणीव लिंबाळे यांना झाली व त्यांनी विद्रोही कविता लिहिल्या.

**अस्मितादर्शने घडविले :**

डॉ गंगाधर पानतावणे यांनी दलित लेखकांना घडविण्याच्या उद्देशाने ’अस्मितादर्श’ मासिक चालविले आहे. दलित लेखक घडविण्यासाठी, त्यांना प्रेरणा देण्यासाठी` ’अस्मितादर्श’चे मेळावे भरविले. या मेळाव्यास शरणकुमार लिंबाळे सतत असायचे. त्यामुळे अनेक दलित लेखकांना त्यांनी जवळून पाहिले. त्यांच्याशी चर्चा केली आणि त्यातूनच त्यांचा साहित्यिकाचा पिंड घडत होता.

त्यांना अस्मितादर्श मेळाव्यापासून प्रेरणा मिळत होती. आंबेडकरी विचारधारेतून लिंबाळेंचा दलित साहित्यिक म्हणून पिंड घडत होता. म्हणून या मेळाव्याविषयी लिंबाळे म्हणतात, 'माझ्या साहित्यिक जीवनातील पहिली क्रांतिकारी घटना म्हणजे उस्मानाबादमध्ये नामांतरचा तणाव होता. अशा तणावातही हा मेळावा झाला होता. एकीकडे तणाव अनुभवत होतो, तर त्यावेळी ह्या तणावाविरुद्ध लढण्याची उर्मीही मनात उफाळून येत होती. मला वाटतं ह्याच मानसिकतेने मला कविता लिहायला प्रवृत्त केले आहे. शरणकुमार लिंबाळे यांना अस्मितादर्श मेळाव्यानींच लिहिते केले आहे. अशा पद्धतीने शरणकुमार लिंबाळे यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व घडत गेले.

**शरणकुमार लिंबाळे यांच्या साहित्याची प्रेरणा :**

प्रत्येक प्रतिभावंताजवळ काहीएक जीवनदृष्टी असते. त्याचप्रमाणे शरणकुमार लिंबाळे ह्यांच्याजवळ आंबेडकरी विचारकार्यातून प्राप्त झालेल्या तसेच जीवनातील दाहक अनुभवामुळे त्यांची स्वतःची अशी एक जीवनदृष्टी आहे. साहित्यिकाच्या व्यक्तिगत आयुष्यात सुखदुःखाचे, आशा–निराशेचे जे नित्य नवीन अनुभव येत असतात, त्यानुसार साहित्यिकांवर त्या स्वरूपाचे संस्कार घडत असतात. कौटुंबिक आणि शैक्षणिक संस्कार. सहवासात येणारे मित्र, शिक्षक व अन्य व्यक्ती, भोवतालचे सामाजिक वातावरण, जीवनामध्ये मिळालेल्या विकासाच्या संधी, अनुभवास आलेले दुःख, अपयश, वेगवेगळे आघात, उदासीनता, निराशा या सर्वांमधून मानवी मनाची जडणघडण होते. त्यामधून त्या व्यक्तीमनावर त्या संस्काराची बीजे खोलवर रुजली जातात. आणि त्यातूनच साहित्यिकाची साहित्यनिर्मिती होत असते.शरणकुमार लिंबाळे यांनी आपल्या वाङ्मयीन वाटचालीमध्ये 'उत्पात' व 'श्वेतपत्रिका' हे काव्यसंग्रह, 'हरिजन', 'रथयात्रा' हे कथासंग्रह, 'भिन्नलिंगी', 'उपल्या', 'हिंदू' व 'बहुजन', 'झुंड', 'ओ', 'सनातन' या कादंबऱ्या तसेच 'अक्करमाशी', 'बारामाशी' व 'राणीमाशी' ही आत्मनिवेदनात्मक पुस्तके अशी सृजनशील निर्मिती त्याचबरोबर 'दलित साहित्याचे सौंदर्यशास्त्र', 'साहित्याचे निकष बदलावे लागतील', 'ब्राह्मण्य' 'दलित आत्मकथा एक आकलन' अशी विपुल साहित्य निर्मिती करणाऱ्या लिंबाळे यांच्या साहित्याच्या प्रेरणा शोधणे गरजेचे आहे.

दलित जाणीव स्वीकारून साहित्यनिर्मिती करणे, तसेच त्यातून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचार आविष्कृत करणे हा सर्वच दलित साहित्यिकांनी, विचारवंतानी महत्त्वाचा विचार स्वीकारला आहे. ह्याला शरणकुमार लिंबाळेही अपवाद नाहीत. जगाच्या साहित्याच्या इतिहासामध्ये एखाद्या व्यक्तीच्या विचाराला केंद्रस्थानी मानून एवढी प्रचंड साहित्यनिर्मिती होणे ही एक दुर्मीळ घटना आहे. म्हणून ज्येष्ठ विचारवंत डॉ. कृष्णा किरवले म्हणतात, 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचाराला केंद्रस्थानी मानून दलित साहित्यिकांनी इतकी प्रचंड साहित्यनिर्मिती केली आहे त्याला मराठी वाङ्मयाच्या इतिहासात तोड नाही. नव्हे एखाद्या व्यक्तीच्या विचाराला केंद्रस्थानी मानून प्रचंड साहित्यनिर्मिती होणे ही जगाच्या इतिहासातील अद्वितीय घटना होय.' दलित साहित्य हे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचाराला केंद्रस्थानी मानून निर्माण झाले आहे.

१९७६–७७ च्या काळात मराठी साहित्यात विद्रोही कवितांचा ठसा ठळकपणे मा दया पवारांचा 'कोंडवाडा', ज. वि. पवार यांचा 'नाकेबंदी', प्रल्हाद चेंदवणकरांचा 'ऑडीट', अर्जुन डागळेचा 'छावणी हालते आहे' या काव्यसंग्रहावर विपुल प्रमाणात वर्तमानपत्रातून साधकबाधक छापून येई. पुढे ढसाळ यांच्या गोलपिठा' काव्यसंग्रहातील विद्रोह, शिव्या यांचा लिंबाळे यांच्या मनावर खोल परिणाम झाला. पाठ्यपुस्तकातून अभ्यासलेल्या मध्यमवर्गीय पांढरपेशी साहित्याची नाळ तुटली. त्यांना दलित कवितेतील विद्रोह जवळचा वाटू लागला. त्यातच मराठी साहित्यातील थोर विचारवंत डॉ. गंगाधर पानतावणे यांचे 'विद्रोहाचे पाणी पेटले आहे' हा ग्रंथ वाचून मनाला समाधान वाटले, तर रत्नाकर गणवीर यांनी संपादित केलेले 'बहिःष्कृत भारतातील अग्रलेख' हे पुस्तक वाचून लिंबाळे यांच्या मानसिकतेत प्रचंड उलथापालथ झाली. त्यातून लिंबाळे यांच्या मनामध्ये दलित साहित्याविषयी प्रखर जाणीव निर्माण झाली. दलित साहित्य त्यांना जवळचे आपले वाटू लागले. डॉ. भालचंद्र फडके यांच्या 'दलित साहित्य वेदना आणि विद्रोह' या समीक्षाग्रंथाने त्यांच्यामध्ये दलित जाणीव व दलित साहित्याविषयी ओढ निर्माण झाली. ते या पुस्तकाविषयी म्हणतात, 'हे पुस्तक वाचून पुढे दलित साहित्यावर पीएच. डी. करण्याची मनात इच्छा निर्माण झाली. ह्या पुस्तकामुळे दलित साहित्य' म्हणजे काय ह्याची जाणीव झाली.' एकूणच लिंबाळे यांच्यावर

आंबेडकरी प्रेरणेच्या साहित्याचा मारा सतत होत राहिला. त्यातून त्यांची वाङ्मयीन दिशा सूचित होण्यास मदत झाली. दया पवार यांचा 'कोंडवाडा' हा कवितासंग्रह वाचत असतानाच 'अस्मितादर्श' या नियतकालिकामधून क्रमशः प्रकाशित होणारे डॉ. जनार्दन वाघमारे यांचे ब्लॅक लिटरेचर विषयाच लेखन 'निग्रो वाङ्मय साहित्य आणि संस्कृती' या ग्रंथाच्या वाचनाने लिंबाळे याच्या मनात दलित जाणीव ठासून भरली व त्यातून त्यांना काव्यलेखनासाठी प्रेरणा मिळाली.

महाविद्यालयीन जीवनात प्रवेश केल्यानंतर लिंबाळे यांचा 'दलित पँथर'सारख्या आक्रमक संघटनेतील सहभाग वाढला. दलितांवरील अन्याय, अत्याचार याविरुद्ध प्रचंड चीड निमाण होऊ लागली. अन्याय, अत्याचार करणाऱ्यांच्यावर गोळ्या झाडल्या पाहिजेत अस त्याना असुरक्षिततेतून वाटू लागले. विषमतावादी समाजरचनेचा फटका आपल्याला बसला आहे. आपल्याला न्याय्य, हक्क मिळविण्यासाठी संघर्ष करावा लागेल. ह्या संघर्षाचे बीज हे बाबासाहेबांच्या विचारात आहे हे त्यांनी ओळखले. म्हणून शरणकुमार लिंबाळे बाबासाहेबांच्या विषयी म्हणतात, 'मनातला उद्रेक, चीड, संताप, बंड, शिव्या, धग, संघर्ष ह्या सगळ्यामागे बाबासाहेबांचा विचार आहे याची जाणीव झाली. बाबासाहेब म्हणजे आपली ऊर्जा आहे, प्राण आहे. बाबासाहेबांना वजा केले तर आपण संपून जाऊ, आपल्याला काहीच अर्थ उरणार नाही अशी जाणीव होऊ लागली. बाबासाहेबांच्या विचारांचा प्रभाव लिंबाळेंच्यावर पडल्यावर दलित चळवळी ह्या बाबासाहेबांच्या विचारावर पोसलेल्या आहेत हे त्यांनी ओळखले. दलित मुक्ती, हक्क, अधिकार यांच्याविषयी लढणारे बाबासाहेब हे प्रमुख शिलेदार होते हे त्यांनी ओळखले. आपली दास्यातून मुक्ती करणारा, गुलामगिरीतून सुटका करणारा, मार्ग देणारा हा बाबासाहेबांचा विचार आहे. म्हणून बाबासाहेबांच्या पुतळ्याकडे अतिभक्तीभावाने पाहणे, बाबासाहेबांचा पुतळा भावनावश होऊन पाहात राहणे, बाबासाहेबांच्या आठवणीने डोळ्यात चटकन पाणी येणे अशी लिंबाळे यांची मानसिकता झाली.

अशा मानसिकतेतून आपण साहित्यनिर्मिती करावी हे ओळखून लिंबाळे यांनी काही कवितांची निर्मिती केली. त्या कवितांना 'ज्वालामुखी' हे नाव देऊन त्यांनी डॉ. गंगाधर पानतावणे यांच्या प्रेरणेने त्या कविता महाराष्ट्र राज्य संस्कृती

मंडळाकडे अनुदानासाठी पाठवल्या. मात्र अनुदान मिळाले नाही. पुढे त्यातील काही उणिवा दुरुस्त करून व आणखीन काही कवितांची भर घालून ‘उत्पात’ नावाचा काव्यसंग्रह प्रकाशित केला. दया पवार यांचे ’बलुतं’ व लक्ष्मण माने यांचे ’उपरा’ या आत्मकथनांनी आपल्या वेगळ्या अनुभवविश्वाने मराठी साहित्यात दलित आत्मकथन म्हणून स्वतंत्र छाप उमटविली आहे. ही आत्मकथने आपल्यावरील या व्यवस्थेने केलेले अन्याय, अत्याचार यांचा आलेख मांडून ही व्यवस्थाच आपल्या लाचारीच्या जगण्याला कारणीभूत आहे, ह्याचा हिशेब मांडतात. शरणकुमार लिंबाळे यांचे जीवन समकालीन आत्मकथनकारांसारखे असूनसुद्धा त्यांचे दुःख वेगळे ठरते. कारण त्यांचा जन्म विवाहबाह्य अनैतिक संबंधातून झाला आहे. या व्यवस्थेने त्यांना ’अक्करमाशी’ ठरविले आहे. ही वेदना मांडण्याच्या उद्देशानेच लिंबाळे यांनी ’अक्करमाशी’ हे आत्मकथन लिहिले आहे. ’वेदना’ आणि ’सृजन’ ही जुळी मुलं आहेत, असे त्यांनी म्हटले आहे. त्याप्रमाणे वेदनेतूनच ’अक्करमाशी’चा जन्म झाला आहे. ’अक्करमाशी’ला अस्पृश्यता’ व ’अक्करमाशी’ पणाचा दुहेरी पदर आहे.

पँथर’ या चळवळीत काम करताना ह्या संघटनेचा फार मोठा प्रभाव लिंबाळे यांच्यावर पडला. लिंबाळे ‘दलित पँथर’ या संघटनेचे सक्रिय कार्यकर्ते आहेत. ही चळवळ त्यांनी जवळून बघितली, अनुभवली म्हणून पँथरविषयी लिंबाळे म्हणतात, ‘दलित पँथर्सची चळवळ झाली नसती आणि नामांतराचे आंदोलन व्यापक व तीव्र झाले नसले, तर मी दलित लेखक झालो असतो की नाही याविषयी शंका वाटते’ ही चळवळ लिंबाळेच्या प्रेरणास्थानी आहे.

लिंबाळे यांनी दलित जीवनाचे, दलितांवरील अन्याय-अत्याचार यांचे विशिष्ट अनुभवातून, प्रसंगातून ’हरिजन’ या कथासंग्रहातून चित्रण केले, तर ’रथयात्रा’मध्ये दलित जीवनातील प्रगतीचे गुंतागुंतीचे चित्रण केले.

दलित कविता, कथा, आत्मकथा आणि नाटके इत्यादी वाङ्मयप्रकार विपुल प्रमाणात लिहिली गेली. त्यामानाने दलित कादंबरीचा प्रांत समृद्ध नाही. काही कादंबऱ्या प्रकाशित होत असल्या तरी त्यांचे स्वरूप लक्षवेधी ठरत नाही. अशावेळी शरणकुमार लिंबाळे यांनी जाणीवपूर्वक कादंबरी लेखन केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या महापरिनिर्वाणानंतरच्या काळातल्या समकालीन

वास्तवाला सामोरे जाण्याच्या उद्देशाने लिंबाळे यांनी 'उपल्या', 'हिंदू' व 'बहुजन' या शृंखलात्मक कादंबऱ्या लिहिल्या. त्याचबरोबर शिक्षणव्यवस्थेतील भ्रष्टाचारावर, जातीयतेवर बोट ठेवण्यासाठी 'झुंड' ही कादंबरी लिहिली.

एकूणच शरणकुमार लिंबाळे यांच्या साहित्याच्या प्रेरणा या डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारकार्यातून तसेच दलित साहित्य व चळवळीतील ज्येष्ठ व्यक्तिमत्त्वांच्या प्रभावातून शोधता येतात. लिंबाळे यांनी साहित्यनिर्मिती करत असताना दलित जाणीव स्वीकारून लेखन केले आहे. त्याचबरोबर त्यांच्या लेखनाला समाजाच्या वास्तव परिस्थितीचे भान आहे. चळवळीत काम करीत असताना चळवळीतील स्वार्थी गटबाजी राजकारण, दलितामधील गटतट यामुळे ते अस्वस्थ होतात. या अवस्थेतूनच समाजात, चळवळीला मार्गदर्शन करण्याच्या हेतूने त्यांनी साहित्यनिर्मिती केली आहे.

संदर्भ :
१. लिंबाळे, शरणकुमार – अक्करमाशी, दिलीपराज प्रकाशन, पुणे
२. लिंबाळे, शरणकुमार – पुन्हा अक्करमाशी, दिलीपराज प्रकाशन, पुणे
३. लिंबाळे, शरणकुमार – काव्याची बांधिलकी जीवनाशी (लेख) सकाळ, पुणे १२.३.१९८९
४. शिरवाडकर, वि.वा – अध्यक्षीय भाषण, मुंबई व उपनगर, म. सा. संमेलन १४ वे, १९५६
५. किरवले, कृष्णा – दलित चळवळ आणि साहित्य, मॅजिस्टिक प्रकाशन,पुणे



